॥ महाराष्ट्र साहित्यसेवक ग्रंथमाला ॥

पुष्प १५ वें.

# विवाहितांचें नक्षत्रदर्शन!

लेखक

गं. रा. साने, बी. ए., बी. टी.

प्रस्तावना

प्रा. श्री. म. माटे, एम्. ए.



प्रथमावृत्ति ]     किंमत ३ रु.     [ सन १९५०

प्रकाशकः-
गं. रा. साने, बी. ए., बी. टी.
संपादक, महाराष्ट्र साहित्यसेवक ग्रंथमाला,
पुणे २.

॥ समर्पण ॥

प्रस्तुत पुस्तकांत वर्णिलेलीं कर्तव्यें
पार पाडण्यासाठीं
परमावधीचा प्रयत्न करणाऱ्या
सर्व विवाहित बांधवांना
प्रस्तुत पुस्तक
सादर
समर्पित आहे.

—ग्रंथकर्ता.

मुद्रक—
प्र. ज. पाध्ये,
स्वाधीन मुद्रणालय,
१०१७ सदाशिव, पुणें २.

# प्रस्तावना

## ले.—श्रीपाद महादेव माटे

'विवाहिताचे नक्षत्र दर्शन' या पुस्तकाचे लेखक रा० गंगाधर रामचंद्र साने, बी. ए. बी. टी. हे एक मोठे कसलेले लेखक आहेत. त्यांनी स्वतःच्या हिंमतीवर, 'महाराष्ट्र-साहित्य-सेवक ग्रंथमाला' या नावाची एक ग्रंथमाला आज कित्येक वर्षे चालविली आहे. प्रस्तुत पुस्तक मात्र 'जीवितोद्धार-ग्रंथमाला' या त्यांच्या नव्या मालेचे तिसरें पुस्तक आहे. 'मुलांचा मार्गदर्शक' व 'तरुणांचा तांडेल' अशीं दोन पुस्तकें या मालेंत आधीच प्रसिद्ध झालीं आहेत. "आपल्या आर्य लोकांच्या आश्रम-व्यवस्थेच्या आदर्शांत चतुराश्रमांची योजना मोठ्या चतुरतेनें केलेली आहे. अर्थात् त्यांतील प्रथमाश्रमाचें, तो पहिला म्हणून जें महत्व आहे, त्याकडे लक्ष देतांना साहजिकच दोन भाग करून पहिलीं दोन पुस्तकें त्यावर लिहिलीं. त्यानंतर गृहस्थाश्रमीयांकरितां प्रस्तुत पुस्तक हातीं घेतलेले असून, त्यानंतर पुढचें पुष्प वानप्रस्थ आणि संन्यास या दोन्ही आश्रमांच्या जोड-विचारांनी भरलेलें 'प्रौढांचें प्रबोधन' या नांवाचें काढण्याचा आमचा विचार आहे. अशाच प्रकारचीं चार पुस्तकें स्त्री-वर्गासाठीं लिहून, स्त्री पुरुषात्मक मानवजातीच्या जीवितोद्धाराचे आमच्या मतें असलेलें आदर्श चित्र आम्ही पुरें करणार आहों, व अशी ही संकलित ग्रंथमाला आम्ही जनता-जनार्दनाच्या चरणीं वाहून भगवान् श्रीकृष्णाच्या गळ्यांत त्याच्या वैजयंतीशेजारीं ही आमची मोहनमाळ अर्पण करणार आहों.' श्री. साने यांनीं आपल्या या उपक्रमाचें वर्णन अशा प्रकारें केलेलें आहे. प्रस्तुत पुस्तकाचा त्यांचा उपसंहारही वाचण्यासारखा आहे. या उपसंहारांत ते म्हणतात, 'सद्गृहस्थहो, या उपसंहारांत शेवटीं मला तुम्हांला हेंच सांगावयाचें आहे कीं, माझें हेंच पुस्तक नव्हे, तर सर्वच पुस्तकें, आपण अजून वाचलीं नसल्यास, विचारपूर्वक वाचा. उगीच बरवर पाणी उडविल्यासारखें करूं नका. त्या कामीं आपल्या प्रत्येक कृतीचें प्रत्येक पाऊल, मग ते लहान गोष्टींत असो, वा मोठ्या गोष्टींत

असो, आपल्या देशाच्या, धर्माच्या, नीतीच्या, देवाच्या, समाजाच्या, राष्ट्राच्या, आणि आत्म्याच्या कल्याणासाठीं आणि उन्नतीसाठींच पडत आहे ना, याचा विचार करा. हे मी आपणाला गर्वानें सांगत नाहीं; तर तळमळीनें सांगत आहें. माझी योग्यता मोठी म्हणून मी हे मिरवीत नाहीं; तर केवळ ' बुडतें हे जन । न देखवें डोळा ।। म्हणोनि कळवळा। आला त्याचा ! ।। या भावनेनें मीं हें बोलत आहे ......... सद्गृहस्थहो, वास्तविक प्रस्तुत सारखे ग्रंथ लिहिण्याची का माझी योग्यता आहे ? पण त्या सूत्रचालक परमात्म्यानें मजला निमित्त करून, हीं सर्व सूत्रे हलविलीं आहेत ! यात माझें असे काय आहे ! ' उपसंहारातील या वाक्यावरून साने यांची भावना चांगली व्यक्त होते व त्यांची परमेश्वरावरची निष्ठाही दिसून येते. साने यांच्या हातून आखलेली योजना ईश्वर कृपेनें परिपूर्ण व्हावी, असेच मला सुद्धा वाटते.

श्री. साने यांच्या प्रस्तुतच्या पुस्तकांत लौकिक स्वरूपाचे कितीतरी विषय येऊन गेलेले आहेत. यातील कांहीं विषय निकालांत निघालेले आहेत व कांहींचीं विवाद्य रूपे अजूनही कायम आहेत. श्री. साने यांनीं आपल्याकडून मत–प्रदर्शनाच्या दृष्टीनें, सर्वच विषयाचा निकाल लाव-लेला आहे. परंतु त्यांच्याशीं यांपैकीं प्रत्येक विषयांत सहमत होणें सर्वां-नाच साधेल असें मला वाटत नाहीं. तथापि, महाराष्ट्रातील सुशिक्षित समाजाच्या बहुतेक लोकांचीं जीं सामाजिक व राजकीय मतें आहेत, तीं साने यांच्या लेखनांत प्रतिबिंबित झालीं आहेत, असें स्थूलमानानें म्हणता येईल. त्यांच्या राजकीय मताविषयीं सुशिक्षित लोकांतसुद्धा बरेच मतभेद होतील, असे वाटतें. याला साने यांचा कांहीं इलाज नाहीं. कोणीही लेखक झाला, तरी तो दुसरें काय करू शकणार ! मात्र साने यांनीं आपल्या मतांना ठिकठिकाणीं अग्र उत्पन्न करून दिलें आहे. हीं मतें सर्वथा निर्णायक आहेत, अशी वाचकाची समजूत घालण्याचा त्यांचा हेतू दिसतो, तो मात्र मला पसंत नाहीं. कालमान इतक्या त्वरेनें बदलत आहे

कीं, कोणाही माणसाला, या पुस्तकात उपस्थित केलेल्या प्रश्नासबंधानें, फार झालें तर, जुजबी स्वरूपाचें बोलता येईल, निकालाचे बोलता येणार नाहीं जर कोणी आपलें बोलणे निकालाचें आहे, असें मानील, तर थोड्याच अवकाशात, ते जुजबी स्वरूपाचे आहे, असें त्याचे त्यालाच दिसू लागेल. या दृष्टीनें पाहता ' सूत्रचालक परमात्म्यानें मजला निमित्त करून हीं सर्व सूत्रें हलविलीं आहेत, ' हे शब्द श्री. साने यानीं केवळ विनम्र भावाने लिहिले आहेत असेंच समजावयास हवें.

एकाद्या अनाचारासबंधाने, अन्यायासंबंधाने, किंवा गफलतीसबंधानें लिहिताना, साने याच्या लेखणीला तिखट चव येऊ लागते. तेवढा प्रकार सोडला तर, त्याचें सर्व लिखाण अत्यंत सुरस आणि आल्हादकारक वाटतें. त्याच्या लिहिण्यातील सफाई तर, विशेषच लक्षात घेण्यासारखी आहे. निरनिराळ्या वाङ्मयातील प्रसगोचित वचनें उद्धृत करण्याच्या कामीं, त्याच्या लेखनात दिसत असलेली कुशलता फारच थोड्याना साधेल. हीं वचनें सहजासहजी नेमक्या ठिकाणीं येऊन बसताना दिसतात. मात्र याची गर्दी जरा जास्त होते, येवढें म्हटलेंच पाहिजे. आपलें बोलणें किती, आणि लोकाचे आवाहन करून आणलेले किती, याच्या प्रमाणाचा तरतम-भाव, त्या त्या वाङ्मयाच्या ज्ञानामुळें व आवडीमुळें, प्रसगविशेषीं मागें पडणें, हेंही स्वाभाविकच आहे. असो. श्री. साने याच्या मनाचे सर्व आवेग साधेसुधे आणि उदारपणाचे असतात. त्याच्या लिखाणात कोठे छक्के पंजे किंवा पगदस्तीपणा दिसावयाचा नाही. त्याच्या लेखनातून त्याचे मन स्वच्छ दिसतें. हा गुण लेखकाच्या अनेक गुणात सर्वश्रेष्ठ आहे असे मी समजतों.

आजपर्यंत त्यांचीं प्रसिद्ध झालेलीं पुस्तके लोकानीं आवडीनें वाचलीं आहेत, असे प्रस्तावना व उपसहार यावरून दिसून येतें. त्याच आवडीने, वाचकवर्ग त्याच्या याही पुस्तकाचें स्वागत करील असा बळकट भरवसा वाटतो.

पुणें, ३१ ७ ५०

# "नक्षत्रदर्शना" पूर्वी

कविवर्य टेंभुर्णीकर यांची "नक्षत्रास" ही कविता शिकवीत असतां "तिमिर पार द्युति अपार। साक्ष तुझी दिव्य थोर। त्यावरि जो टेवि नजर। तोचि भाग्यशाली!" हे त्यातलें कडवें मला अत्यंत आवडले व प्रस्तुत पुस्तकाचे नामसंस्करण करताना त्या कवितेतील "नक्षत्र" म्हणजे 'ध्येय' हा अर्थ मला हृदयगम वाटून तेंच नाव विवाहितांचेसाठीं लिहिलेल्या प्रस्तुत पुस्तकाचें नावात गोवावे असे वाटले शिवाय, विवाहाचे दिवशीं सायंकाळीं सूर्यास्तानंतर आकाशात चमकणाऱ्या नक्षत्रांचें दर्शन वर आपल्या वधूला करवीत असतो हे सर्वश्रुतच आहे, व त्यातहि हाच अर्थ सखोल दृष्टीने भरलेला आहे असें मला वाटतें व म्हणून त्याहि दृष्टीनें हे नाव समर्पक होईल व नाविन्यहि साधेल अशा सर्व दृष्टींनीं विचार करून प्रस्तुत पुस्तकास तेच नाव दिलेले आहे. तें वाचकास आवडेल असा भरवसा आहे.

प्रसिद्ध साहित्यिक प्रा. श्री. म. माटे, एम्. ए. यांचे मागें अनेक कामें असूनहि वेळात वेळ काढून त्यांनीं प्रस्तुत पुस्तकास आपली सुंदर प्रस्तावना लिहून दिली, याबद्दल त्यांचे मी मन:पूर्वक आभार मानतों.

तसेच प्रस्तुत पुस्तकास अद्ययावत्‌पणा शक्य तितका आणण्याचें कामीं माझ्या प्रयत्नास प्रचोदक झालेले माझे मित्र श्री. दा. ना. मोघे, बी. ए. यांचाहि मी आभारी आहे.

पुस्तकावरील तिरंगी चित्र श्री. दलालांचे हाताखालीं तयार झालेले चित्रकार श्री. गागल यांचें असून त्यांनीं तें परिश्रमपूर्वक सुंदर काढून दिल्याबद्दल त्यांचे आभार मानणे योग्यच होईल.

सरतेशेवटीं ज्या मंगलमयाचे कृपेनें प्रस्तुत पुस्तक प्रकाशित करकरण्याचा सुयोग लाभला त्याचें अनन्य स्मरण करून, व शक्य तितकी काळजी घेऊनहि कांहीं मुद्रणदोष पुस्तकात राहून गेले असल्यास त्याबद्दल वाचकांची क्षमा मागून पुरें करतों.

८३ शुक्रवार, पुणें २.
दि. १-८-५०

सर्वांचा नम्र,
गं. रा. साने

—श्री. ग. रा. साने, बी. ए. बी. टी. कृत—

## " तरुणांचा तांडेल ! " किंमत १ रुपया, या पुस्तकावरील

# कांहीं निवडक अभिप्राय

" १६ ते २४ वर्षांमधील तरुणाना सन्मार्गाला लावण्यासाठीं लेखकानें अंतःकरण पिळवटून या पुस्तकातील प्रकरणें लिहिलीं आहेत. आपल्या विधानाच्या समर्थनार्थ भगवद्‌गीता, दासबोध वगैरे ग्रंथातील उतारे लेखकाने भरपूर दिले असून पाश्चात्य विद्वानाचेहि अभिप्राय मधून मधून दिले आहेत. हें पुस्तक मुलाना बोधप्रद होईल यात शंकाच नाहीं. मुखपृष्ठावरील गदाधारी बलभीमाचें छायाचित्रहि मुलाना स्फूर्तिदायकच आहे. "

—" त्रिकाळ "

" या पुस्तकात तरुणाना सध्याच्या बिकट परिस्थितींत कोणत्या शिक्षणाची जरूरी आहे याचा उहापोह करण्यात आला आहे. भाषा साधी व सरळ असून विचार निर्दोष व पद्धतशीर आहेत. मधून मधून योग्य स्थळीं टाकलेलीं थोर लेखकांचीं मोठमोठीं वचनें शोभून दिसतात. एकंदरींत पुस्तक तरुण-तरुणींनीं अभ्यासावयास योग्य असून अवश्य संग्रहीं ठेवावें. "

—" मन्वंतर "

" मुलासाठीं सन्मार्गप्रवर्तक अशीं पुस्तकें रा. साने यानीं पुष्कळ लिहिलीं आहेत. त्यात या पुस्तकानें चांगलीः भर पडणार आहे. टाशीव लहान वाक्यें, सुभाषितें, अवतरणें, आवाहन देणारी लेखनपद्धति इ० वैशिष्ट्यामुळे नित्याचे नीतिपाठहि लेखकाने वेधक करून दाखविले आहेत. ह्या पुस्तकाचा नीतिशिक्षणाचे कामीं चांगला उपयोग होईल." —" आनंद "

" रा. साने यास आपला विषय सुबोधपणें समजावून सांगण्याची हातोटी चांगली साधली आहे. शिक्षण व लेखक ह्या दोनहि नात्यानीं त्यांचें वाचन मोठें आहे. या पुस्तकात त्यानीं विद्यार्थ्यांना व तरुणांना उच्च भूमिकेवरून कळवळून बोध केला आहे आणि तोहि जे थोर सत्पुरुष, महात्मे व संत होऊन गेले त्यांच्या शब्दानीं केला असल्यामुळें लहानानीं व तरुणानीं हें पुस्तक वाचलें असतां त्याना आपली स्वतःची सुधारणा कर-

ण्याची बुद्धि झाल्याशिवाय खास रहाणार नाहीं. या तऱ्हेची मुलांच्या हातीं देण्यास सर्वस्वी योग्य पुस्तकें क्वचितच निर्माण होतात. —" केसरी "

" तारुण्याचा काल हा जीवनात अत्यंत महत्त्वाचा जातो. तारुण्याचा काल म्हणजे नसानसातून सळसळणाऱ्या रक्ताचाच काल तो. अशा वेळींच त्याना कोणी तरी सन्मार्ग दाखविणारा, त्याच्या आशा, आकाक्षाना चागलें चळण लावणारा हितोपदेशक हवा असतो आणि तें काम लेखकानें या पुस्तकाच्या द्वारें उत्तम प्रकारे केलें आहे. शारीरिक, मानसिक, बौद्धिक, आध्यात्मिक शिक्षणाचें सम्यक् विवेचन करून स्वाभिमान, स्वदेशाभिमान याचे महत्त्व पटवून देऊन सरते शेवटीं तरुणाचे ' विवाहमगल ' करून लेखकानें हें पुस्तक पूर्ण केलें आहे. सुगम भाषा, साधार विवेचन, व्यापक दृष्टि इत्यादि गुणानीं हें पुस्तक सजलेलें असल्यामुळे तरुणानीं ते एकवार अवश्य लक्षपूर्वक वाचावें असें आमचें सागणें आहे. " —" चैतन्य "

श्री. गगाधर रामचंद्र साने यानीं आपल्या " जीवितोद्धारग्रथमालें " त लिहिलेल्या " तरुणांचा तांडेल " या ग्रथाचीं मुद्रितें मीं लक्षपूर्वक वाचलीं. या ग्रंथात, शारीरिक शिक्षण, मानसिक शिक्षण, बौद्धिक शिक्षण, आध्यात्मिक शिक्षण, शिक्षणाची संपूर्णता, अभिमानाचे सात सूर, आचारः प्रथमो धर्मः, व विवाहमगल अशीं प्रकरणें असून ती भाषेच्या व आतील मजकुराच्या दृष्टीनें उत्तम साधलीं आहेत. त्यातल्यात्यात अभिमानाचे सात सूर, हें प्रकरण तर विशेष बहारीचें वठलें आहे. निकोप विचार व पद्धतशीर माडणी, व त्याच्या समर्थनार्थ थोर थोर कविलेखकाचीं उदार हस्तानें ग्रथभर विखुरलेलीं वचनें हा ह्या ग्रंथाचा विशेष होय. एकंदरीनें पाहता, हा ग्रंथ संग्राह्य झालेला असून, तो प्रत्येक कुटुबातील वडील मंडळींनीं आपल्या कुटुबातील तरुणतरुणींना अवश्य अभ्यासावयास लावावा, अशी माझी शिफारस आहे.

पुणें ता. १४–१–३८ ल. ब. भोपटकर.

# विवाहितांचें नक्षत्रदर्शन

## प्रास्ताविक

प्रस्तुत पुस्तकमालेचें नाव " जीवितोद्धार–ग्रथमाला " असे असून भगवत्कृपेनें तिच्यांतून आतापर्यंत " मुलाचा मार्गदर्शक " व " तरुणाचा ताडेल " अशीं दोन पुस्तकें प्रसिद्ध झालीं, व आता हे तृतीय पुस्तक " विवाहिताचे नक्षत्रदर्शन " लिहावयास हातीं घेत आहे. तरी पहिल्या दोन पुस्तकाप्रमाणेच्च हेहि पुस्तक चागल्या रीतीने पार पडो, अशी त्या जगन्नियत्याजवळ आमची प्रारभींची प्रार्थना आहे. ती तो ' दयाळु माधव ' पुरवील, असा आजवरच्या अनुभवावरून दृढ विश्वास वाटत आहे. असो.

आपल्या आर्यलोकाच्या आश्रमव्यवस्थेच्या आदर्शात चतुराश्रमांची योजना मोठ्या चतुरतेने केलेली आहे, हें प्रिय वाचकांस ठाऊकच आहे. अर्थात् त्यातील प्रथमाश्रमाचे, तो पहिला म्हणून जें महत्व आहे, त्याकडे लक्ष देता साहाजिकच दोन भाग करून पहिलीं दोन पुस्तकें त्यावर लिहिलीं. त्यानतर गृहस्थाश्रमीयांकरितां प्रस्तुत पुस्तक हातीं घेतले असून, त्यानतर पुढचे पुष्प वानप्रस्थ आणि सन्यास ह्या दोन्ही आश्रमाच्या एकदम जोड-विचारानें भरलेलें असे " प्रौढाचे प्रबोधन " म्हणून काढण्याचा आमचा बिचार असून, अशाच प्रकारचीं चार पुस्तकें स्त्रीवर्गासाठीं लिहून, स्त्रीपुरुषात्मक मानवजातीच्या जीवितोद्धाराचें आमच्या मतें असलेलें आदर्शचित्र आम्ही पुरे करणार आहो, व अशी ही सकलित ग्रंथमाला आम्ही जनता-जनार्दनाच्या चरणीं वाहून भगवान् श्रीकृष्णाच्या गळयात त्याच्या वैजयती-शेजारीं ही आमची मोहनमाळ आम्ही अर्पण करणार आहों! ही आमची मनीषा तो भक्तकामकल्पद्रुम प्रभु पुरवील अशी आम्हास आशा आहे. असो. आता पुढील पानापासून प्रस्तुत पुस्तकास प्रारभ करतों. तरी वाचकांनीं लक्षपूर्वक अवधान द्यावे, अशी नम्र विनंती आहे.

———

## नक्षत्र १ लें

# गृह आणि गृहस्थाश्रम !

गार्हस्थ्यांत पदार्पण केलेल्या पुष्कळ जीवाना गृह म्हणजे नकोसें वाटतें. त्याना बाहेर भटकायची—नाटक, सिनेमा, आणि हॉटेल्स यातून रमण्याची व तेथील मौजा आणि मौजेचे पदार्थ उपभोगण्याची सवय झाल्यामुळें गृह व गृहातील सुख त्याना नकोसे होतें ! गृह म्हटलें कीं, त्याच्या कपाळाला तिडीक उठते, आठ्या पडतात, व ते तसेंच बाहे चालते होतात ! पण पारमार्थिक बाबतींत ज्याप्रमाणे सर्व सुखाचा ठेवा स्वतःच्या हृदयांत असून मनुष्य सुखासाठीं त्रिखड धुडीत बाहेर हिंडत असतो व शेवटीं बापड्याची फसगत होऊन तो त्या दिव्य सुखाला मुकतो, तीच गत इथेंही होऊन गृहस्थाश्रमाचीं सुखें गृहात न धुडता तो तीं इतर ‘गृहात’—नाटक, सिनेमा, वेश्या, मदिरा, विश्राति इत्यादि गृहांतून शोधीत असतो. पण यापैकीं कोणचेंहि गृह खऱ्या गृहाची बरोबरी करूं शकणार नाहीं हें त्या बापड्यास माहीत नसतें, आणि म्हणूनच सुखासाठीं इतकी वणवण करूनहि त्याची सुखाची तळमळ कायमच असते ! अशा गरीब बापड्या जीवाला मला हेंच सागायचें आहे कीं, बाबारे, “सुखासाठीं करिशि तळमळ । तरि तू पढरीसी जाय एकवेळ ॥ मग तूं अवघाचि सुखरूप होशी । जन्मोंजन्मींचें दुःख विमरशी ॥” ह्या नामदेवाच्या उपदेशाप्रमाणेंच मीहि तुला म्हणतो कीं, बाबारे तुला सुखाची खरी इच्छा असेल, तर स्वतःच्या घरच्या पंढरीला चल ! अहाहा ! शुद्ध, विनिर्मल व निष्काम प्रेमाची चद्रभागा जिथें झुळझुळ वहात आहे, लहानग्या बालकाच्या रूपानें नटलेले पुंडलीक ह्या चंद्रभागेच्या काठीं मातृपितृप्रेमाच्या वाळवंटात जिथे सहजानदात खेळत आहेत, व विविध नात्याचे सतजन जिथें सद्गुणाचा व सन्मार्गाचा जयजयकार करून राहिले आहेत, व परोपकाराचा बुक्का जिथें एकमेकाच्या कपाळीं लावला जाऊन सर्वांच्या

सुखाची स्मरणी जिथें नित्य जपली जात आहे, आणि "प्रेमनाम जगदीश फुलोर काय आणखी सांगू?" या कव्युक्तींत गायियेला प्रेमाचा परमेश्वर ज्या गृहमंदिराच्या गाभाऱ्यात सदैव हर्षानें डुलत वसति करून राहिला आहे अशा ह्या पंढरीचा परित्याग करून तूं त्रिखंड धुंडीत गेलास तरी पामरा, तुला तें चित्सौख्य सांपडेल काय? केव्हांही शक्य नाहीं! कारण लक्षांत ठेव कीं, खरें सुख हें बाह्योपाधींपेक्षा आंतरिक हेतूंतच सांठलेलें असतें. सूर्योदयीं विकसणारे पुंडरीक व चंद्रोदयीं पाझरणारे चंद्रकांत मणी, प्रेम-रवीच्या उदयामुळे गृहाच्या सरोवरांतील बाळ पुंडरीक कसे फुलतात—खुल-तात—उमलतात व हसतात व प्रेमचंद्राच्या आगमनानें व दर्शनानें नात्या-गोत्याचीं, सगासोयऱ्याचीं, इष्टमित्राचीं हृदयें कशीं पाझरूं लागतात—विशेषतः आपल्या सन्निध असणारी निकटवर्ती नात्याची मंडळी कशाहि स्थितींत आनंद मानतात, व भाकरीच्या वाळलेल्या तुकड्यातहि अमृताचा निर्झर कसा उत्पन्न होतो, हेंच दाखवितात. तें पाहिलें म्हणजे ह्या आंत-रिक हेतूची सत्यता तुला पटेल, व खऱ्या सुखाचें निधान तुझ्या हातीं लागून तूं आनंदानें नाचूं लागशील! कविवर्य रे. टिळकहि खऱ्या सुखाचें निधान ह्या घरच्या कोरड्या भाकरींत सुद्धा कसें भरलेलें असतें तें आपल्या अमृतोपम वाणींत सांगतात :—

"तोंडि लावाया प्रेमहसित वाचा। विनोदाचे रायतें पात्रि ज्याच्या
मीठभाकर कोरडी, सुधा त्याला। महाभाग्याच्या धन्य सागराला ॥ १ ॥
सकल सुरसाचें मधुर सार काढा। स्वर्णपात्रीं तें आणुनिया वाढा ॥
तरी घरचें जें अन्न तेंच थोर। फिकें होइल पीयूष त्या समोर ॥ २ ॥"

पण असें होण्याचें कारण काय? स्वर्णपात्रांतील पंचपक्वान्नाहूनहि घरची मीठभाकरच अधिक गोड कां लागावी बरें? वाचकहो, याचें कारण एकच! व तें म्हणजे त्या पंचपक्वान्नांना कटु जहराचें पाणी पाजणारी हला-हलतुल्य बोलणीं बाहेर ऐकूं येतात, तर घरच्या प्रेमहसित वाचेनें ओल्या-

कोरड्या भाकरींतहि अमृताचा स्रोत वाहू लागतो ! हें निर्मल, निस्वार्थ, उच्च आणि परोपकारी प्रेम घरावाचून अन्य कुठें बरें पहावयास मिळेल ? अहाहा ! धन्य धन्य ते गृह ! म्हणूनच " my sweet home " म्हणजे " माझें आवडतें घर " म्हणून प्रत्येक इंग्लिश मनुष्य आपल्या घराची आठवण करीत असतो ! संरक्षणाचा एक अभेद्य किल्लाच त्याला तो वाटत असतो ! ह्या गृहाच्या सारगींतलें सूर भिन्न असले, तरी त्यातून एकच संगीत बाहेर पडत असते ! आणि तें सगीत म्हणज दुसरं तिसरं कोणते नसून अहंकाररहित एकमेकाची सवा व परोपकार याचेच होय ! स्वार्थ, कपट, अभिमान, ह्या सर्वांना हद्दपार करून निर्मल व अव्याज प्रेमाचे साम्राज्य जर कुठं पहावयास सापडत असेल, तर तें एक गृहातच होय ! ह्या प्रेमतरूखालीं उभं राहून त्यास गदगदा हलविले असताना फलपुष्पाचा सडा कसा घरभर पसरतो व लहान बालके तो कसा वेचीत असतात व आत्मसात् करीत असतात, तें पाहण्याची मौज काहीं औरच आहे ! पण हें सर्व सुंदर, रमणीय, आणि चित्ताल्हादक दृश्य कोठे बरं दृष्टीस पडेल ? तर एक गृहातच होय ! हेंच ह्याचें उत्तर नाहीं काय ? अहाहा ! घरातल्या ह्या निष्काम सेवेचें आणि अकपटवृत्तीचें बहारीचें चित्र रेखाटून " जगीं उपमा कोणती त्या गृहातें ? " असा कविवर्य टिळक साहजिकच सवाल टाकतात, तो किती हृदय डोलविणारा आहे बरें ! ऐका ते काय म्हणतात ते :—

" सर्व माझेपण एकवटे जेथें । जिथें प्रेमाचें राज्य सदाचे तें ॥
स्वार्थ कपटाचा लेश नसे जेथें । जगीं उपमा कोणती त्या गृहाते ॥
जिथें नाहीं अभिमान कुणा ठावा । एकमेकाची जिथें नित्य सेवा ॥
जिथें परहित तें स्वहित मानवातें । जगीं उपमा कोणती त्या गृहाते ॥"

पण हा सर्व थाट एका प्रेमाच्या पायावर हसत डोलत असतो, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. गृह म्हणजे प्रेमाचा वृक्ष होय, प्रीतिलतिकेचें निवासस्थान

म्हणजे गृहच होय ! ममत्वाच्या आलवालात लावलेली ही प्रेमलतिका काहीं काळ विरह झाल्यास त्या विरहाच्या उन्हानें व त्यामुळें उत्पन्न होणाऱ्या व एरवींहि मुबलक असणाऱ्या प्रेमानंदाच्या अथवा विरहदुःखाच्या अश्रूंनीं कशी भरारत असते तें पाहिलें म्हणजे—

"ऊन पाऊस हीं जशीं एक होतीं । हसें रडणें होईल त्याच रीती ॥"
ह्या "सुशीले" च्या उद्गारांतील खरें मर्म वाचकास सहज समजून येईल ! विशेषतः बाल्यावस्थेंत प्रेममय परमेश्वरापासून ह्या जगतीतलावर अवतीर्ण झालेल्या लहानग्या जीवाला तितक्याच तोडीच्या प्रेमामृताची किती जरूर असते, व त्याची धार मातापिता आणि बंधुभगिनी ह्यांच्या रूपानें त्यावर कशी सतत वाहत असते, हें "सुशीलेच्या शाळेस सुटी" झाल्यावर तिच्या तोंडून सहज निघालेल्या उद्गारावरून दिसून येईल. ती म्हणते :—

"म्हणे आतां भेटेल मला आई । बाप भाऊ प्रिय ताइ आणि माई ॥१॥
माय माझी भेटेल मला जेव्हां । आसवांनीं न्हाणील मला तेव्हां ॥
मुका बाबा घेतील कपोलाचा । हसुन भाऊ घेईल गालगुच्चा ॥२॥
ताई माई सारून दुरी खेळ । धावुनिया मज मिठ्या मारितील ॥—"

पण गृहाची योग्यता केवळ ह्या प्रेमामुळेंच श्रेष्ठ ठरत आहे असें नसून, इतरहि तितक्याच महत्त्वाची फलप्राप्ति आपणास ह्या गृहापासून होत असते, हें लक्षात ठेवलें पाहिजे. धर्मशिक्षण, नीतिशिक्षण, देवभक्ति, देश-भक्ति, परोपकार, सहनशीलता, आज्ञाधारकपणा, वचनपालन इत्यादि कितीतरी उच्च तत्वांचीं बीजें आपल्या मनोभूमींत असतात त्यांना कोंब फुटून तीं वाढीस लागायला व त्यांचा प्रचंड वृक्ष बनून त्यांना फुलें, फळें यायला गृहरूप उद्यानच कारणीभूत होतें व उपयोगी पडतें, हें विसरून चालणार नाहीं ! मोठमोठे वीर, पंडित, कवि, साधुसंत, आणि साध्वी स्त्रिया ज्या ह्या जगात आजवर उत्पन्न झाल्या, आज असतील, अथवा पुढेंहि होतील, त्या सर्वांना मूळ आद्य कारण हें गृह होय—ह्या गृहांतली शिकवण

होय—हें विसरून कसें चालेल ? फार काय, सर्व विश्वाचा विस्तार, आणि सर्व प्रपञ्चाचा पसारा ह्या गृहामुळें आणि गृहातून होत असतो हें लक्षांत ठेवलें, म्हणजे ह्या अल्पशा वटवृक्षबीजात समग्र संसृतीचा वृक्ष कसा सामावून राहिला आहे, याची खरी कल्पना मनात येऊन मन थक्क होतें, व " धन्य धन्य " असें उद्गार ह्या गृहाबद्दल सहज मुखावाटे बाहेर पडतात !

अशा प्रकारचें हे गृह असून त्यातील गृहस्थाश्रम जर धन्य व्हायला पाहिजे असल, " धन्यो गृहस्थाश्रम : " असे आनंदोद्गार बाहेर पडावला हवे असतील तर त्याला :—

" सानंद सदनं सुताश्च सुधियः कांता प्रियालापिनी ।
सन्मित्रं सुधनं स्वयोषिति रतिश्चाज्ञापराः सेवकाः ।
आतिथ्यं शिवपूजनं प्रतिदिनं मिष्टान्नपानं गृहे ।
साधोः संगमुपासते हि सततं "

अशी स्थिति असायला पाहिजे, तरच " धन्यो गृहस्थाश्रम : " हें चतुर्थ ओळींचे उत्तरार्ध आपणास पुरें करता येईल, हे लक्षात ठेवले पाहिजे ! ह्यातील एक एक गोष्टीचा आता आपणांस विचार कर्तव्य आहे ! पैकीं ' सानंद सदन ' " my sweet home " चा विचार मी येथवर केला असून, स्वगृहाला सानंद सदन कसें करावें—आनंदभुवन कसे बनवावें, त्याला काय काय गोष्टी लागतात, कोणकोणच्या गोष्टींचें परिपालन अवश्य आहे व काय केले असता आपला गृहस्थाश्रम धन्य होईल, हेंच आपणांस आता पहावयाचें आहे, व त्यासाठींच हे " विवाहितांचें नक्षत्रदर्शन " प्रवृत्त झालें आहे ! चला तर आता पुढच्या प्रकरणापासून तेच सांगण्यास प्रारंभ करू !

———

नक्षत्र २ रें

## गृहलक्ष्मीचा मानसन्मान !

गृहलक्ष्मीची योग्यता फार मोठी आहे ! गृहातली लक्ष्मी म्हणजे श्री आणि ही गृहलक्ष्मी म्हणजे स्त्री ह्या दोन्हीही सारख्याच आहेत : स्त्रिया म्हणजे मूर्तिमत लक्ष्मीच होत ! साकार लक्ष्मी म्हणजेच स्त्री होय ! " स्त्रिय:श्रियश्च गेहेपु न विशेषोऽस्ति कश्चन ॥ " असें मनूनें म्हटलेंच आहे ! म्हणूनच जणू काय स्त्रियाना उत्तमोत्तम वस्रालकाराची निसर्गतःच आवड असते; कारण लक्ष्मीला लक्ष्मीची आवड असावी ह्यात नवल तें काय ? आणि खरोखरच श्रीयुक्त स्त्री ही अधिक खुलून दिसते, तिचें सौंदर्य दुप्पट वाढून दिसतें, हें कोणाहि रसिकाला कबूल केलेच पाहिजे. आणि त्यात आश्चर्य तरी काय आहे ? एका दिव्याच्याऐवजी दोन दिवे लावले असता प्रकाशाची दुप्पट वाढ व्हावी, ह्यात नवल काय ? आणि स्त्रिया ह्या " गृहदीप्ति " च होत, असे मनूने म्हटलेंच आहे ! अर्थात् स्त्री आणि श्री याचा सयोग म्हणजे सोन्यावर जडाव, किवा दुधात साखर या न्यायाने अधिकच गोड व्हावा ह्यात नवल नाहीं ! आणि यासाठींच सर्व प्रकारच्या वैभवानीं स्त्रियाना सतुष्ट ठेवावे, असा शास्त्रकाराचा आदेश आहे !

कारण, सर्व सुखाचें मूळ अशी जी लक्ष्मी—कीं जी इद्रादिक बाहुल्याचा व अमरपुरीसारख्या घरकुलाचा खेळ करून राहिली आहे—ती लक्ष्मीदेवीच प्रत्यक्ष साकार होऊन प्रत्येक गृहागृहाचे ठायीं येऊन राहिलेली आहे, हें लक्षात ठेवले पाहिजे आणि म्हणूनच—

" राजलक्ष्मी राजगेहे गृहलक्ष्मी गृहे गृहे "

अशा प्रकारचे धन्योद्गार त्याच्या बाबतींत निघाले आहेत !

गृहाला गृहत्व देणाऱ्या स्त्रिया ह्या प्रत्यक्ष गृहदेवता आहेत : पति हा जर देव असेल, तर पत्नी ही त्याची देवी आहे, आणि तितक्याच

आदरानें आणि सन्मानानें आपण त्याना वागविले पाहिजे : सर्व प्रकारची सिद्धी आपणास प्राप्त व्हावयास पाहिजे असेल, त्या सिद्धींनीं आणि संपत्तीनीं आपल्या घरात हसावें, खुलावें आणि डुलावें असें वाटत असेल, तर स्त्रिया आधीं कशा हसतील, खुलतील नि डोलतील ह्याची काळजी घ्या. कारण स्त्रियाच्या हसण्या रडण्यावरच या सर्व सिद्धींची प्रसिद्धी अवलंबून आहे : स्त्रीचें हसू म्हणजे सर्व प्रकारच्या देवताचें प्रसन्न हास्य, आणि स्त्रीचें रुदन म्हणजे सर्व देवता आणि ऋद्धीसिद्धींच्या निर्गमनाची ती वाटच होय, हे सर्वांनीं लक्षात ठेवावें! फार काय सागावें, ज्या देशात, ज्या ग्रामात, ज्या कुलात स्त्रिया शोक करतात, त्याना योग्य मान दिला जात नाहीं म्हणून जिथें त्या दुःखी असतात, त्या देशाचा, त्या ग्रामाचा आणि त्या कुलाचा सर्वनाश झालाच म्हणून समजावा! "मराठ्यानीं मिळविलेले स्वातंत्र्य फार दिवस का टिकले नाहीं ? आणि तेवढा अपवाद सोडून आज हजारो वर्षे हिंदुस्थान पारतंत्र्याच्या गर्तेत का पिचत पडला आहे ? तसेंच युरोप अमेरिकेची इतकी भरभराट असण्याचें व आज शेकडों वर्षे स्वातंत्र्य आणि संपत्ति ह्या देवता तिकडेच नादण्याचें कारण काय बरे?" असा उघड उघड प्रश्न उत्पन्न करून स्वामी शिवानंदानीं आपल्या "मनोवांछित संतति" नामक पुस्तकात ह्याचें सुंदर विवेचन करून हेंच उत्तर दिले आहे कीं, वरील फरकाचे कारण एकच, आणि तें म्हणजे एकीकडे स्त्रियाना देवता मानून त्यांच्या सर्व सुखासाठीं झटण्याची तयारी व पावलोपावलीं त्याना प्रसन्न ठेवण्याची उदात्त धडपड, तर त्याच्याच उलट दुसरीकडे त्याच स्त्रीवर्गाचा नानाप्रकारच्या छळानीं आणि दुःखानीं शोकार्त हाहारव! वास्तविक, यात शास्त्रकाराचा काहींच दोष नसून ह्या सर्व गोष्टींचा त्यानीं मागेंच स्पष्ट इशारा देऊन ठेवला आहे, व *स्त्रियाना प्रत्यक्ष देवतातुल्य मानसन्मानाने वागवा, त्याची खरी* खरी उदात्त भावनानीं आणि सर्व सुखानीं पूजा करा, तरच त्या प्रसन्न होतील व त्यांच्या रूपानें सर्व देवता प्रसन्न होऊन सर्वार्थकामसिद्धि प्राप्त

होईल, असें त्यानीं निक्षून सांगून ठेवलें आहे, व तसें न वागल्यास प्राप्त होणाऱ्या धोक्याची सूचनाहि पण रीतसर देऊन ठेवली आहे ! मग यात त्याच्याकडे काय दोष ? यात सर्व दोष आपलाच आहे ! पण यापुढे तरी असें वर्तन आपल्या हातून होऊ नये यासाठीं त्या शास्त्रकाराचे ते दिव्य आणि उद्बोधक बोल मी जसेच्या तसेच खालीं देत आहे ! सर्व प्रकारच्या भरभराटीस मुकेलेल्या आमच्या गृहस्थ वाचकानीं ते बोल आणि तीं वचने आपल्या हृदयाच्या चौकटींत बसवून ठेवावीत व मनाची काच वारवार साफ पुसून त्यातील अक्षरें पुनः पुन्हा वाचून पाहून मुखोद्गत करावीत व त्यावर विचार करावा, एवढेच आमचे त्या कामीं त्याना सांगणें आहे ! ऐका ते दिव्य बोल !—

"यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवता : ॥<br>यत्रैतास्तु न पूज्यन्ते सर्वास्तत्राफला: क्रिया : ॥ ५६ ॥<br>शोचन्ति जामयो यत्र विनश्यत्याशु तत्कुलम् ॥<br>न शोचन्ति तु यत्रैता वर्धते तद्धि सर्वदा ॥ ५७ ॥<br>जामयो यानि गेहानि शपत्यप्रतिपूजिता : ॥<br>तानि कृत्याहतानीव विनश्यंति समन्तत: ॥ ५८ ॥<br>तस्मादेता: सदा पूज्या भूषणाच्छादनाशनै: ॥<br>भूतिकामैर्नरैर्नित्यं सत्कारेषूत्सवेषुच॥५९॥" (मनु. अध्याय३)

गृहाला गृहत्व गृहिणीमुळेंच येत असतें :—

" न गृहं गृहमित्याहुर्गृहिणी गृहमुच्यते ॥ "<br>किंवा<br>" गृहं तु गृहिणीहीनं कांताराद‍तिरिच्यते ॥ "

ह्या प्रसिद्ध वचनातून गृहिणीमुळेच गृहाला कसें 'रमणीयत्व' येत असतें, आणि कांतारात सुद्धा कांतेमुळे कसें सौख्य प्राप्त होऊ शकतें, आणि कांतेवाचूनचा संसार म्हणजे कांताराहूनहि अधिक बोचक आणि

बाधक कसा होतो, हें सांगितलें आहे! 'रमणीयत्व' शब्द घेतला तरी तोसुद्धां 'रमणी' ह्या शब्दापासूनच तयार झाला आहे. अर्थात् रमणीमुळेंच रमणीयत्व येत असतें, किंबहुना रमणीय म्हणजे सुदर आणि रमणी म्हणजे सुंदरी; अर्थात् रमणी रमणीयत्वाची, व सुंदरी ही सौंदर्याची उपमेय ठरून जावी ह्यात काय आश्चर्य? एकाच दृष्टिपाताबरोबर जगास झुलविण्याची जादू एक परमेश्वर अथवा स्त्री यावाचून अन्य कोणातही नाहीं. अर्थात् ही 'जादुगारीण' ह्याहि अर्थानें, त्या जादुगार जगदीशाची मूर्तीच आहे असें कवींनीं म्हणत सुटावें यात काय नवल? किंबहुना, त्या त्या परमेश्वराच्या ध्यानाचें वर्णन पाहिलें असता त्यातही आपणास स्त्रीरूपवर्णनच पुष्कळसें ऐकू येते. अर्थात् रमणीरूप परमेश्वर हाच खरा परमेश्वर होय, ह्यात शका नाहीं! मात्र हे त्याचें पारमेश्वरी स्वरूप ओळखून त्या परम ईश्वरी स्वरूपाला आपण तितकाच मान दिला पाहिजे तरच परम ऐश्वर्याचे आपण धनी होऊं हे उघड आहे! पण आपण तसें करतो काय, ह्याचें प्रत्येक सद्गृहस्थानें स्वत:शीं खरें खरें उत्तर द्यावे, म्हणजे शरमेने त्यास आपली मान खालींच घालावी लागेल!

सर्व जग रामाराधनानें वेडे झाले आहे; पण त्यात खरी उच्च भावना कितीकांची आहे बरें? केवळ वैषयिक भावनांनींच हे आराधन सुरू नाहीं का? अर्थात् खुद्द परमेश्वरी सौख्य आम्हास मिळत असूनहि आम्हांस त्याचे ज्ञान नाहीं, आणि म्हणूनच अज्ञानाच्या गोत्यातली कष्टदशा आम्ही भोगीत आहो!

खरोखर स्त्रियाची किती धन्य म्हणावी कीं, ज्या सुखासाठीं सर्व त्रैलोक्य लाळ घोटीत असतें, तें विषयसुख त्या आम्हास मनमुराद लुटू देतात— स्वत: कष्ट भोगून, गर्भारपण आणि बाळतपणाचे हाल काढूनहि, त्या विषयसुखाच्या रूपानें कां होईना, पण प्रत्यक्ष परमेश्वरी आनंद आम्हास चाखवित असतात! पण अशा त्या रामाना, त्या परमेश्वराच्या मूर्तींना आम्ही कसें वागवितों बरें? ह्याचें चित्र काही पद्यातून फार उत्कृष्ट रेखाटलें आहे!

सासुसासऱ्याचा छळ, जावानणदांची उणींदुणीं बोलणीं, आणि दारू, वेश्या आणि जुगार इत्यादि व्यसनापायीं खुद्द पतिकडून मिळणारी पशुतुल्य वागणूक त्या देवताना मिळावी काय ? त्या गृहलक्ष्मींना त्यापायीं शोक करण्याचा प्रसंग यावा काय ! धिःक्कार असो आम्हा स्वार्थांध व कामपिपासु मानवांना! अशा स्थितींत आमची अशीच अधिकाधिक अधोगति व्हावी ह्यांत नवल काय ? ऐका, ह्या दुःखानें गांजून गेलेल्या एका ' राधा ' नामक पूर्वकालीन स्त्रीचा साधाभोळा पण हृदय पिळवटून टाकणारा टाहो ऐका, अथवा, त्या पुढील आधुनिक स्त्रीचेहि काव्यमय उद्गार वाचा, व तुमचीं हृदये त्यांनीं उलून जात नाहींत काय तें सांगा पाहू ?—

(१) (चाल—प्रतिकूल होईल कैसा.)

काय पाप केले म्हणुनी स्त्रि हा जन्म आला । पशूसम वागवीती पुरुष बायकाना ॥ ध्रु० ॥ बालपणीं मातापीता सौख्य आम्हा देती । थोरपणीं सासू श्वशुरे ताडणा करीती । पती क्रोधे मारीतसे धर्म हा बुडाला ॥ १ ॥ दीर जावा पाहूनिया नाके मुरडीती । जावा नणदा निष्ठुर भारी जाच हा करीती । असा काल वीपरीत, कलिप्रवेश झाला ॥ २ ॥ पुन्हा कधीं स्त्रीजन्म हा नको देऊ देवा ॥ मनोभावापासूनीया करित तुझी सेवा ॥ राधा दासी विनवीतसे प्रभुचरणाला ॥ ३ ॥

(२) (चाल—मधुर किती कुसुमगंध.)

खचित बाई व्यर्थ आम्ही अबला ॥ ध्रु० ॥
बागविती नर पशुसम आम्हा, मान नसे कसला ॥ १ ॥
स्वातंत्र्याचा लेश नसे मुळीं, बंदीवास ठरला ॥ २ ॥

× × × ×

वाचक, वरील पद्ये वाचून ज्याचें हृदय हलून जाणार नाहीं असा कोणी अभागी जीव आहे काय? पण असेहि पाषाण आपल्या

समाजात आहेत हें लक्षात ठेवा, आणि त्यांच्यामुळेंच ही भारत-माता इतके दिवस परदास्यपंकात शोकमग्न होऊन पडली होती व अजूनहि तिचे हाल चालू आहेत हें विसरू नका! अरेरे! स्त्री-जातीचा अवमान आणि अवहेलना आपण खुद्द तिच्या जन्मापासून तो तिच्या मृत्यूपर्यंत करीत असतो आणि त्याना पदोपदीं रडवून त्याचा जीवनभार त्याना असह्य करतो! ह्या पापाची फेड आपण कुठे करणार? दुसऱ्याला दुःखात ठेवणाऱ्याला स्वतःसाठीं सुख मागण्याचा काय बरें अधिकार आहे? वाचकहो, आपण भोगीत असलेली कष्टदशा हे ह्या आपल्या पापाचेंच फळ आहे, हे विसरू नका!

वास्तविक स्त्रियाची महती किती श्रेष्ठ आहे! "अर्धं भार्या मनुष्यस्य भार्या श्रेष्ठतमः सखा!" ह्या व्यासोक्तींत स्त्रीला सर्वश्रेष्ठ मित्र म्हटले आहे तें किती उचित आहे बरें? त्याचप्रमाणें त्या स्त्रीला पुरुषाचें अर्धांग म्हणजेच अर्थात् "अर्धांगी" म्हटटे आहे तेंहि स्त्रीपुरुषाचा ससार म्हणजे "दोन डोळे पण दृष्टी एक" याप्रमाणें कसा अभेद भावानें चालला पाहिजे याचेच दर्शक आहे, आणि अशा ह्या ऐक्यातच खरें मौजेचें सगीत कसें भरलेले आहे व त्या संगीताची बहार लुटीत असता प्रत्यक्ष स्वर्गहि कसा त्यापुढे ठेंगणा होतो, याचें कविवर्य टिळकानीं केलेले वर्णन पति-पत्नींच्या बाबतींतहि किती गोड रितीनें लागू पडतें याचें खालील ओळी प्रत्यतर देत आहेतः—

"भिन्नमूर्तिमधिं चित्त एक जेथें। भोगि दुःखाते अनुभवी सुखातें।
स्वर्ग वाटे हा मर्त्यलोक जेथे। जगीं उपमा कोणती त्या गृहातें?॥"

—('सुशीला' काव्य)

अर्थात् अशा रितीने जेथे पतिपत्नींचा अभेद भाव आहे व तीं एकमेकावर पूर्ण सतुष्ट आहेत अशा ठिकाणींच खरे कल्याण प्राप्त होऊं शकतें, हे मनूच्या खालील श्लोकावरूनहि दिसून येईलः—

"संतुष्टो भार्यया भर्ता भर्त्रा भार्या तथैवच। यस्मिन्नेव कुले नित्यं कल्याणं तत्र वै ध्रुवम् ॥६०॥" ( मनु० अ. ३ ).

अशा अभेदभावानें तुमच्याशीं एक तुमचा खरा खरा मित्रच राहील! ह्या मित्राची महती किती मोठी आहे तें मी माझ्या "मुलांच्या मार्गदर्शिका"त सांगितलेंच आहे, व अशा मित्रांत आणि सख्यांतहि श्रेष्ठतम सखा म्हणजे एक केवळ आपली भार्याच होय, ह्यात तिळमात्र शंका नाहीं! ह्या सत्याची सत्यता अशा भार्येला आणि अशा सती सावित्रीसारख्या स्त्रीला गांजणाऱ्या आणि छळणाऱ्या नरपशूनांहि शेवटीं पटते, व मग ते सुधाकराप्रमाणे "सिंधू, सिंधू" म्हणून शोकसिंधूंत बुडत असतात! पण त्याचा मागून काय उपयोग असतो? यासाठीं वेळ गेली नाहीं तोंच सावधान!

स्त्रिया या पुरुषासाठीं किती नानाप्रकार झटत असतात, त्यांच्या सुखांत सुख आणि दुःखांत दुःख त्या कशा मानीत असतात, ह्याचें चित्र लहानपणीं आईच्या रूपानें, आणि तरुणपणीं पत्नीच्या रूपानें आपणांस पहावयास सांपडतें! स्त्रिया या नाजुक साजुक वेलीप्रमाणें असतील, पण झंझावात सुटला असतां त्या वेली जशा प्रचंड वृक्षानांहि सांवरून धरतात, त्याचप्रमाणे प्रपंचांतील दुर्दैवाच्या झंझावातांत आपणास बिलगून बळकटी आणि धैर्य देणाऱ्या या स्त्रियाच होत! त्या आपणाबरोबर वनवास आणि अज्ञातवास करण्यास तयार असतात, वाटेल त्या अग्निदिव्यास त्यांची तयारी असते, इतकेंच नव्हे, तर प्रत्यक्ष जिवंतपणीं यमाबरोबर जाऊन अगर जाळून घेऊन, म्हणजेच सती जाऊन, त्या आपलें नितांत प्रेम व्यक्त करीत असतात हें सीता, सावित्री, द्रौपदी, दमयंती, इत्यादि आर्य स्त्रियांचे आदर्श आपणास सांगत आहेत. पुनर्विवाहाची जेथें सर्रास मोकळीक आहे अशा इंग्लंड सारख्या देशांतूनहि शंभरापैकीं अवघ्या १४च स्त्रिया पुनर्विवाह करितात आणि बाकीच्या करीत नाहींत, असें कै. न. चिं. केळकरांनीं म्हटलें आहे. यावरूनहि स्त्रियांचें दिव्य प्रेमच दिसून येतें. पण अशा

स्त्रीजातीचा मान आम्ही कसा ठेवतो बरें! अशी अग्निदिव्ये, आणि पत्निबरोबर सहगमन तर राहोच, पण साधें विधुरावस्थेचें व्रत तरी आजन्म पाळणारे किती नरपुगव आपल्या दृष्टीस पडतील बरें? असे दृष्टीस पडणें तर राहोच, पण उलट पहिल्या पत्नीच्या तेराव्या दिवशींच दुसऱ्या पत्नीच्या गळयात मिठ्या मारणारे, आणि एक मेली दुसरी, दुसरी मेली तिसरी, याप्रमाणें वाटेल तितक्या बायका करणारे, किंबहुना, प्रथम-पत्नीच्या जिवतपणींच अनेक सवती निव्वळ चैनीखातर तिच्या उरावर लादणारे–तिच्या दुःखावर डागण्या देण्यास आणून बसवणारे–इतकेंच नव्हे तर, अगदीं वृद्धपणीं सुद्धा तरुण कुमारिकाच्या गळयात माळ घालण्यास उद्युक्त होणारे वृद्ध कपि आपल्या समाजात किती बरे आजवर पहावयास सापडत होते? व कायद्यानेच सवतींना प्रतिबध करावा लागला ना? द्रव्य घेऊन कन्या-विक्रय करणारे आणि स्नेहलतेच्या उदाहरणानें डोळे न उघडता हुड्याच्या रूपानें वधूच्या पित्याला राजरोस लुटणारे लोक अगदीं गरिबापासून तो श्रीमंत लक्षाधीशापर्यंत अजूनहि किती आहेत बरें? पण या सगळ्याचा अर्थ काय हें मोठमोठ्या सुज्ञ आणि समजस म्हणविणाऱ्या अक्कलवताच्याहि लक्षात येत नसावे, असें मोठ्या दुःखानें म्हणावे लागते! याचा अर्थ अत्यत पूजनीय आणि वदनीय अशा स्त्रीजातिचा हा भयकर अपमान, आणि अवहेलना होय ह्यात शंका नाहीं! कै. ताबे यानीं हीच गोष्ट, "भयचकित नमावें तुज रमणी । जन कसे तुडविती तुज चरणीं॥" ह्या सुदर पद्यात सागितली आहे. पण यःकश्चित् रजकाच्या–रजःकणाची किंमत नस-लेल्या दीड दमडीच्या धोब्याच्या–शब्दावरून, एकदा अग्निदिव्यानें प्रत्यक्ष अग्निनारायणाने खात्री केली असताहि सीतेच्या परित्यागास तयार होणाऱ्या व लवकुशाच्या जन्मानंतर तिला पुन्हा अग्निदिव्य करायला सागून 'दे माय धरणी ठाय' अशी अक्षरशः तिची अवस्था करून सोड-णाऱ्या रामरायानीं स्त्रीजातीचा आपण किती मान ठेवतो, हेंच त्यावेळीं दाखविलें ना? याहूनही भयंकर व चीड आणणारा प्रसग द्रौपदीवर

गुदरलेला आहे! आपल्या जुगार खेळण्याला धर्माचें गोड नांव देऊन त्या जुगारी धर्माच्या धुर्दीत त्या जुगारी धर्मानें प्रत्यक्ष स्वतःची पत्नि—आर्या द्रौपदी—पणास लावावी, आणि स्वतःप्रमाणेंच तिलाहि परक्याची दासी करून तिजवर वस्त्रहरणादि भयकर प्रसग आणावेत, यातहि स्त्रीजातीला आपण कितपत मान देतो, हेंच त्यानें दाखविलें ना? वनवासात बरोबर येणाऱ्या दमयतिसाध्वीचा परित्याग घोर अरण्यात करून, तिला शोकार्णवात लोटून, तिजवर पुढील अनर्थपरपरा कोसळण्यास कारण होणारा नळराजा, आपण स्त्री जातीचा दर्जा किती थोर मानतो, हेच दाखवितो ना? या कामीं अपवाद एक सत्यवानाचा व इतिहासकालीन तुरळक व्यक्तींचा सापडतो; पण तो वरील नियमच सिद्ध करीत आहे, व तो नियम हाच कीं, स्त्रीजातीचा मान आम्ही फार थोडा ठेवतों! ही परपरा फार जुनी आहे, व ती आजतागायत चालू आहे! आणि म्हणूनच आपण हजारों वर्षे परदास्यपकात पिचत पडलेलों होतो, व अद्यापिहि आपले हाल चालू आहेत, हें सर्व सद्गृहस्थानीं लक्षात ठेवावें, व आपल्या गृहिणीचा—गृहलक्ष्मीचा—गृहदेवतेचा योग्य रितीनें मान मरातब राखण्यास काडीचीहि कसूर करू नये, तरच राष्ट्रीय उद्धाराच्या दृष्टीने आपणास आशा आहे, हें लक्षात ठेवावें.



## नक्षत्र ३ रें

# गृहाच्या बगीच्यांतील फुलें !

फलपुष्पहीन अशा वृक्षवेलींनीं भरलेल्या उद्यानांत जर आपण गेलो तर आपणांस आनंद होईल काय ? जाई, जुई, गुलाब, बटमोगरा, सोनचाफा, चाफेकळी, पारिजातक, इत्यादि विविध फुलांनीं फुललेल्या व बहरलेल्या वृक्षलताकडे पाहून व अशा रमणीय बागेंत सहल करून मनाला जो आल्हाद होतो, नेत्राना जें सुख होतें, नाकाला जी सुवासाची मौज अनुभवण्यास सापडते आणि गात्राना जो सात्त्विक असा सुखद स्पर्शानुभव प्राप्त होतो व त्यामुळें सात्त्विक वत्सलभावानें जें सर्वांग थरारून जातें, त्या दिव्यानंदाची मौज पुष्पहीन उद्यानात अनुभवण्यास येईल काय ? वाचक, खरोखरीच्या बागेंत वरील विविध पुष्पें आणि कलिका जे कार्य करतात, तेच कार्य गृहरूप उद्यानात म्हणजेच घराच्या बागेंत लहान बालक व बालिका करीत असतात, असें नाहीं का तुम्हाला वाटत ? आपले काव्यमय चक्षू जर तुम्ही उघडून पाहिलेत, तर तुम्हास असेंच दिसून येईल कीं, मुलें आणि फुले अथवा कलिका आणि बालिका ह्यात काहींच फरक नाहीं,—त्या सारख्याच आहेत ! आपल्या लहानग्या फुलबाळाला कडेवर घेऊन मंद मद वाऱ्याच्या झुळकीबरोबर डोलणारी उद्यानातील लता, आणि आपल्या लहानग्या हंसऱ्या छकुल्यास कडेवर घेऊन प्रेमवायूच्या मदमद झुळकेनें जिची देहलता त्या बालकाला खेळविण्यास—झुलविण्यास—मागे पुढे हलत आहे अशी गृहातली गृहिणी, ह्या दोन्हीहि कविहृदयाला सारख्याच आहेत ! आणि खरोखरच बालकात आणि पुष्पात, मुलात आणि फुलात किती साम्य आहे बरें ? दोन्हीहि आपल्या सौन्दर्यानीं, मृदुल स्पर्शानीं, आणि कमनीय क्रीडानीं चित्तास सारखाच संतोष देत असतात ! लहानपणचें जीवन हें खरोखरच सर्वांशानें सुखद व विलोभनीय असतें, ह्यात शंका नाहीं ! आणि यासाठींच " रम्य तें बाळपण देई

देवा फिरुनी ” म्हणून प्रत्येकजण परमेश्वरापाशीं प्रार्थना करीत असतो ! विशेषतः बाल्य आणि वार्धक्य या दोन टोकाचा विरोध तर चित्ताची अधिकच कालवाकालव करतो ! बाळपणीं निष्पापता, चैतन्यमयता, आणि सुखपूर्णता या तीन गोष्टींनीं प्रत्येक बालक नटलेला असतो, पण वयाच्या वाढीबरोबर ते तिन्हीहि गुण हळूहळू लुप्तप्राय होत जाऊन, वृद्धपणीं तर केवळ त्याची स्मृतिच अवशिष्ट राहते. “ हाय हाय ! लहानपणची ती पाखराप्रमाणें असणारी चैतन्याची भरारी आता कुठे आहे ? ” असे म्हणून एक आंग्ल कवि हळहळत आहे ते यासाटीच. सुश्लिष्टता, सौन्दर्य, गोजिरवाणेपणा, आनंदी व सुखपूर्णवृत्ति, ह्यानीं युक्त असणाऱ्या बालकाचे कोडकौतुक निरनिराळ्या गाण्यातून आणि पाळण्यातून विविध कवींनीं आजवर केलेले आहे व सर्व सासारिक जीवानीं आपल्यापरी त्याची साथ मोठ्या प्रेमाने केली आहे ! ईश्वरसान्निध्यात ते कसे अहर्निश खेळत असतात व सच्चिदानंदस्वरूपात ते कसे डुबत असतात, ते पाहण्याची मौज काहीं अद्भुत आहे ! शात व काव्यमय दृष्टीने मुकाट्याने जो ही मौज पाहील त्यालाच ती दिसेल, व त्यालाच तिचे खरें कौतुक वाटेल ! “ सृष्टि सारी खेळते तया सगें । कुठें बाळाचे चित्त न हो रगे ? ” अशा प्रकारचा थाट तिथे चालू असतो ! सबध जीवसृष्टींत हीच मौज पहाण्यास सापडते ! उन्हातान्हातून आणि थंडी-वाऱ्यातून वासराप्रमाणे धावणारीं व उड्या मारणारी तीं चैतन्यमय आनंदी बालके पाहिलीं, म्हणजे कोणाच्या मुखातून “ अहो दृष्ट दर्शनीयं ! ” असे उद्गार बाहेर पडणार नाहींत ? आणि “ धन्यास्तदंगरजसा मलिनी भवति ” ह्या दुष्यंताच्या उक्तीचे खरें हृद्गत अशा धावत्या पाखराना जवळ घेतलें असता, त्याच्या स्फुरणाऱ्या चैतन्याचा आपणालाहि जो क्षणैक सुखानुभव येतो, त्यावेळीं बरोबर पटते !

बालकाना रत्नाचीहि उपमा देतात. “ गृहरत्नानि बालकाः ” हे वचन प्रसिद्धच आहे ! अर्थात् त्याच्या माता म्हणजे अशा रत्नाच्या

खाणीच होत! रत्नाची उपमाहि मुलाना साजत नाहीं असें कोण म्हणेल? कोणचीहि कुंडली घ्या; तीवर "कन्यारत्नं प्रासूत" अथवा "पुत्ररत्नं प्रासूत" अशीं अक्षरें आपणास पहावयास सांपडतात! ह्यावरूनहि रत्नाची योग्यता त्या मुलामुलींना आहेच, व तीच खरी अमूल्यार्चे जगाच्या निदर्शनास यावें, हीच त्या कुंडलीलेखकाची इच्छा असते, असें आपणास दिसून येतें!

बालकांना नक्षत्राचीहि उपमा देतात हें आपण व्यवहारात पाहतोच! "तो मुलगा कसा अगदीं नक्षत्रासारखा आहे!" किंवा "पोर कशी नक्षत्रासारखी सुंदर आहे हो!" असे उद्गार हरघडी आपण ऐकत असतों, त्यावरून हेंच दिसून येतें! आणि नक्षत्राची उपमाहि मुलाना लागू पडत नाहीं काय? पुष्पातला सुवास, रत्नातलें तेज, नक्षत्राची चमक, पाखरांचें मंजुळ गायन हीं सर्व मुलांचें हसणें, खेळणें, खिदळणें, नाचणें, बागडणें आणि मृदु, मंजुळ असे बोबडे बोल बोलणें, ह्यात अन्य रूपानें रूपांतरित झालीं आहेत, असेंच दिसून येत नाहीं काय? कविहृदयाला, रसिकाला तरी तें खास दिसून येतेंच येतें! आणि संसारात सुखानुभव हवा असेल, तर इतर वृत्तीबरोबरच कविहृदयाचीहि आवश्यकता व जाणीव याची जरूर आहे, असेच दिसून येईल! ही काव्यमयता मात्र कवींच्या कागदी चोपड्यातच दडून बसलेली नसून, त्या काव्यानें सर्व जग भरलेलें आहे;—गुराख्याच्या झोंपडींत, मेंढपाळाच्या दरींत, वाऱ्याच्या झुळकात, पांखरांच्या भरारींत, पाण्याच्या लहरींत आणि कशाकशांत म्हणून सांगावें?—ईश्वरस्वरूपाप्रमाणें तें सर्वत्र आहे, पण "जवळींच परी दुरावलें। नवल कैसें ॥" ह्या कव्युक्तीप्रमाणें जवळ असूनहि तें आपणांस दिसत नाहीं, त्याला कोण काय करणार? "Poetry is at your door" म्हणजे "काव्य तुमच्या दाराशीं आहे!" असें कवि म्हणतो, तें तत्त्वतःच नव्हे, तर अक्षरशःहि सत्य आहे; कारण, त्याच दाराशीं तीं पहा, ह्या काव्याला विषयभूत होणारीं तुमचीं बालकें कशीं स्वेच्छ खेळत आहेत! सद्गृहस्थहो,

ही मौज जरूर अनुभवण्यास शिका! सरतेशेवटीं बालकाला वर दिलेल्या सर्व उपमा ज्यात एकत्रित झाल्या आहेत, व त्या सर्वांच्यापेक्षांहि बालकाची मनोज्ञता अधिक असल्याचें ज्यांत सप्रमाण पटवून दिलें आहे, व ज्याची चालहि म्हणण्यास मोठी गोड आहे, अशा कविवर्य टिळकांच्या एका सुंदर काव्याचा उतारा खालीं देऊन, नतर अशा प्रकारच्या फुलाना कसें फुलवायचें, अशा रत्नाना कसे पैलु पाडायचे, म्हणजेच अशा बालकाची योग्य ती निगा राखून त्याची स्वदेश, स्वधर्म, स्वसमाज यास उपयुक्त होईल अशी सर्वांगीण वाढ कशी करायची, याच्या विचारास मी लागणार आहे! प्रथम कविवर्य टिळकाचें बहारीचें काव्य ऐका:—

( चाल—जन हे दोष जया म्हणती० )

ताइ तू फूल गडे माझें, ताइ तू नक्षत्रचि माझें!
ताइ तू रत्न गडे माझें, ताइ तू पाखरुं गे माझें!
या सर्वांहुन गोड गोड गे शीलरूप तूझें।
याची उपमा नच साजे! ॥ ध्रु० ॥

फुल हे हसतें तू हंसशी, परी तव अर्थ किती हास्यीं!
काय फुलाच्या मला पाकळ्या दावितील मौजे।
जसे हे ओठ गडे तूझे! ॥ १ ॥

तू तर तेजस्वी करिशी, येइल जवळ तुझ्या त्यासीं।
नक्षत्राचा गण चमके गे हा उसन्या तेजें।
निराळें वैभव तव ते जे! ॥ २ ॥

रत्नें चमचमचम करितीं, परि तीं कठिण किती असतीं।
साठविलेलें तेज किती तें वाढत नाहीं जें!
वाढतें तेज गडे तूझें! ॥ ३ ॥

गाई पाखरु गानाला, एकविध अर्थ नसे त्याला।
गान तुझें परिसुनी स्वर्गिंचे दूत गानपटु जे।
नाचती सुखे, ताइ माझे! ॥ ४ ॥

× × ×

अशाप्रकारें फुलाच्या पाकळ्याहून अधिक मौजा दाखविणाऱ्या त्या बालकाच्या ओष्टाना, नक्षत्राचे उलट स्वयंप्रकाशानें चमकणाऱ्या त्याच्या नेत्राना, रत्नाच्या उलट वाहत्या तेजाची गगा ज्यांच्या नसांनसातून उसळ्या मारीत आहे अशा त्याच्या शरीराना, आणि पाखराहून मधुरतम व अर्थपूर्ण सगीत गाणाऱ्या त्यांच्या कंठाना कोणत्या प्रकारचें शिक्षण द्यायचें, त्याची वाढ कशी करायची या प्रश्नाकडे आता आपण वळूया !

प्रथमत: शिक्षण कोणी द्यावें हा प्रश्न घेऊं. निसर्गाचें शिक्षण जर निर्भेळ मिळेल तर त्यासारखें दुसरें चागलें शिक्षण नाहीं, यात शका नाहीं. रूसोच्या 'एमिली' या पुस्तकांत हेंच दाखविलें आहे. या कामीं "Education of Nature" नामक, आग्लकवि वर्डस्वर्थ याची कविताहि मोटी वाचनीय आहे :

" Three years she grew in sun & shower,
And Nature said, 'A lovelier Flower
On earth was never sown "

इत्यादि त्या कवीच्या रम्य ओळी वाचल्या, म्हणजे खरोखर हृदय खुलू लागतें आणि मन डुलू लागतें ! पण निसर्ग असा निर्भेळ आणि निर्मळ राहिला आहे काय ? त्या निसर्गांतील मानवी जात त्या निसर्गनियमाना धरून वागत आहे काय ? मनुष्यानें ह्या निसर्गाच्या नदनवनाचा आपल्या कृतीनें दुसरा नरक बनवला आहे, असेंच आपणास दिसून येत नाहीं काय ? विशेषत: मनुष्यामनुष्यामधील जे व्यवहार आहेत आणि मनुष्याचे खुद्द स्वत:शीं जे व्यवहार आहेत, त्या सर्वांमध्ये कवींनीं, तत्त्ववेत्त्यांनीं, आणि शहाण्यानीं शोक करावा असाच आजकाल पुष्कळसा भाग दिसत नाही काय ? हीच गोष्ट वरील कवि वर्डस्वर्थ आपणास एका दु:खपूर्ण गीतात सांगत आहे. तो म्हणतो--

" To her fair works did Nature link
The human soul that through me ran,
And much it grieved my heart to think
What man has made of man ! "

साधी शुद्ध हवेची राहणीच घ्या! पशुपक्ष्यादि जीव आणि सर्व उभिद्ज कोटीतलीं तृणधान्यें, पुष्पें हीं त्या निसर्गातील शुद्ध वायूचा स्वैरानंद किती स्वेच्छपणे घेत असतात बरें? पण आम्हास तो कितीसा चाखावयास मिळतो? हवा, पाणी, ऊन, इत्यादि निसर्गाजवळ असणाऱ्या शुद्ध सुखाच्या साधनाच्या दिव्य मेव्यात आम्ही आपल्या अशुद्ध राहणीनें विषच कालवीत नाहीं काय? यासाठींच " Go back to Nature" म्हणजे "परत निसर्गाकडे—नैसर्गिक राहणीकडे चला, त्या राहणीचा अवलंब करा; सुखात राहायचें असेल तर निसर्गमातेच्या अंकावर जितकें मनमुराद लोळता येईल तितकें लोळा!" हाच सर्व सुज्ञाचा आणि डॉक्टराचा उपदेश आहे! पण आम्ही अभागी जीव तिकडे कशाला लक्ष देतो आहोत? अर्थात् ही शिकवण त्या मुलाना आपणास द्यावी लागणार आहे. ही झाली खुद्द नैसर्गिक राहणीची, म्हणजे मनुष्य आणि निसर्ग ह्याच्या संबंधाची गोष्ट! पण याहूनहि भयंकर अवस्था मनुष्याच्या नात्यात म्हणजे व्यवहारात आपणास दिसून येते! नीतिशास्त्र, धर्मशास्त्र, समाजशास्त्र, शारीरशास्त्र, सुप्रजाजननशास्त्र इत्यादि सर्व शास्त्राना धाब्यावर बसवून मनुष्याची वागणूक केवळ "मनःपूत समाचरेत्" म्हणजे मन मानेल तशी चालू आहे! व त्यामुळें अर्थात् या जगाच्या नंदनवनाचा नरक आम्ही आमच्या हातानीं कसा करून टाकला आहे, ह्याचें चित्र विविध कवींच्या काव्यातून मोठें पहाण्यासारखें आहे! त्यातील कांहीं वेंचक भागच मी खालीं देतों. ऐका:—

"'शिरें तोवरी भुतें भोंवतीं' म्हण ही साधी भारी।
परि अनुभूती सकल बुधाची हीत ओतली सारी॥
विचार तैसा उच्चाराचा प्रवाह कोठे आहे?।
उच्चारासम आचाराची श्रेणी कोठे आहे?॥
मनात भलतें, जनात भलतें, हा तुमचा व्यवहार।
कापट्याचा सागर म्हणजे हा तुमचा संसार!॥"

(टिळककृत—'वनवासी फुल').

" रांडापोरें वंचक चोरें जंवर मिळविता तंवर थवा।
शिरें तंवर तीं भुतें भोवतीं कोण कुणाचा सखा जिवा ! ॥ "
—( रामजोशीकृत फटका )

असो. पण अशाही जगाशीं आपण कसें सप्रेम वागलें पाहिजे याचें—" जो खांडावया घावो घाली । कां लावणी जयानें केली । दोघां एकचि साउली । वृक्षु दे जैसा ॥ "—इत्यादि ज्ञानेश्वरप्रतिपादित वचनाचाच अनुवाद करून कविवर्य टिळक म्हणतात—

" शरीर झिजवुन चंदन देतो परदेहाला शांती ।
स्वयें सोसुनी ताप तरूत्तम दे इतरां विश्रांती ॥
फार कशाला, अन्यहितास्तव खाडें खाडें होता ।
निजदेहाची तीच धन्यता वाटे तरूच्या चित्ता ! ॥ "

अर्थात् जगरूपानें नटलेल्या जगदीशाला आणि त्याच्या कृतीला नांवें ठेऊन जगदीशाचीं स्तोत्रें गाण्यानें तो जगदात्मा संतुष्ट होईल काय ? म्हणूनच " जगच्चालका कशी आवडे मती जगावर रुसली ? " असे कविवर्य टिळक विचारतात तें योग्यच आहे. आणि यासाठींच ह्या जनीं जनार्दनाच्या आणि जगीं जगदीशाच्या प्रेमाखातर आणि सेवेपायीं प्राणविसर्जनाचा प्रसंग आला तरी आपण कचरतां, डगमगतां, किंवा मार्गे हटतां कामा नये, हीच खरोखर मुक्ति आहे—

" प्रेमासाठीं सुखा विसरणें हीच सुखाची पूर्ति ।
प्रेमासाठीं देहविसर्जन हीच खरोखर मुक्ती ! ॥
प्रेमनाम जगदीश फुलांरे काय आणखी सांगू ? ।
पुरे करी वनवास याहुनी काय दुजें तुज मागू ? ॥ "

अशा प्रकारें " वनवासी फूल " नामक काव्यरूपानें करावयाच्या बोधाचें सार जें कविवर्य टिळक यांनीं सांगितलें आहे, तें किती उचित आहे बरें ! आणि तें आपणांस त्या लहानग्या बालकांस शिकवावे लागणार नाहीं काय ? कारण, मानवी समाजाच्या स्वार्थी, नीच, आणि मत्सरी वृत्तीच्या विषारी

वायूनें झपाटलें जाऊन वरील दिव्य वृत्तींचा त्याला विसर पडण्याचाहि पूर्ण संभव ह्या मर्त्यलोकात आहे, हें उघड नाहीं काय? अर्थात् यासाठीं त्या मुलाला निसर्गाप्रमाणेंच आपणहि शिक्षण देणें येणेंप्रमाणें अवश्य ठरतें! आता सदर शिक्षण केव्हापासून द्यावें, अथवा केव्हापासून सुरू होतें, या विचाराकडे आपण वळूं या.

मुलांना द्यावयाचें शिक्षण त्यांच्या मातेच्या गर्भावस्थेतील प्रथम दिवसापासून सुरू होतें, म्हणजेच गर्भ राहावयाचा तो राहतानाच पति-पत्नींच्या मनाच्या ध्यानाची जी छबी असेल, त्याप्रमाणें तें मूल जन्मास येण्याचा संभव असतो. फोटो घेताना ज्याप्रमाणें तुम्ही जसे बसले असाल तसे हुबेहुब निघता, अथवा, आरशात ज्याप्रमाणें आपल्या सर्व हावभावाचें हुबेहुब प्रतिबिंब उठते, तोच प्रकार इथेंहि दृष्टीस पडतो. एकंदरींत परमार्थातला ‘कीटकीभ्रमर’ न्याय येथें हुबेहुब लागू पडतो, असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं. यासाठींच शय्यागारात भिंतीवर सभोवार मोटमोठे वीर, सत्पुरुष, व साधुसंत यांचे फोटो लावावेत: व गर्भाधानसमयीं अथवा संभोगकाळीं जशा प्रकारची थोर विभूति आपणांस जन्माला यावीसे वाटत असेल, तशा प्रकारच्या विभूतींचें ध्यान उभयविध दंपत्यांनीं आपल्या मनात करावें;—विशेषत: पुरुषांनीं त्याकाळीं व त्यावेळीं विशेष सावधानता दाखविली पाहिजे, असें तज्ज्ञांचें सांगणें आहे. ‘पुण्यप्रभाव’ नाटकात कालिंदीच्या तोंडीं कै. गडकऱ्यांनीं ‘वाजिवरे बाळा’ ह्या पद्यात हेंच सत्य मोठ्या गोड रितीनें निदर्शनास आणून दिलेलें आहे, तें मोठें ऐकण्यासारखें आहे. कालिंदी म्हणते—“अस्फुट विश्वाचे। प्रेमाचे। गाणें आनंदाचें ॥ वदलो जें नादीं। सवादीं। तुझिया जन्माआधीं ॥ बाळा ते बोल। तूं बोल। आज मनीं जे खोल ॥ रात्रींच्या काळीं। जों बसली। ब्रह्मा-नंदी टाळी ॥ मनिं तेव्हां बाणें। जें गाणें। अस्फुट मजुळवाणें ॥ धीर न परि हृदया। उघडाया। उघडपणें ते गाया ॥ गाणें मंजुळ तें। रुळझुळतें। तुझिया बाळयाभवतें ॥ बाळा हालू दे। बोलू दे। आनंदे डोलू दे! ॥”

इत्यादि. यावरून प्रस्तुत विषयाचे महत्व नवविवाहित दांपत्याच्या मनावर ठसेल, अशी आम्हास आशा आहे. या कामीं " मनोवांछित संतति " नामक पुस्तक उमरावतीच्या स्वामी शिवानदांनीं लिहिलें असून तें प्रत्येक नवविवाहितानें अवश्य वाचून पहावें, अशी जोराची शिफारस केल्या-वाचून आमच्यानें रहावत नाहीं! तें वाचलें असता, 'मनोवांछित संतति' प्राप्त होण्यास संततिशास्त्राचे कोणकोणचे नियम आपण पाळले पाहिजेत, या तत्वाचा ठसा प्रत्येक वाचकाचे मनावर अत्यंत जोरदार रितीनें उमटल्या-वाचून राहणार नाहीं, हें आम्ही प्रतिज्ञेवर सांगतों! असो.

गर्भाधानसमयींच्या या मुद्याचें इतकें महत्त्व असण्याचे कारण हेंच कीं, 'मधुचन्द्रा'ची पहिली रात्र ज्या दिवशीं उजवावयाची त्या दिवशीं जो जीव पत्नीच्या गर्भाशयात प्रविष्ट होईल, त्याप्रमाणेंच तिला पुढे डोहाळे होत असतात, आणि तसाच पुत्र पुढे प्राप्त होत असतो! आणि प्रत्येक संभोगकालीं याची खबरदारी घेण्याचे कारण इतकेंच कीं, कोणत्या काळीं ते पुण्यवान् प्राणी 'क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति' ते समजण्यास निदान आपणाला तरी वरवर पाहता कांहींच साधन नसते.

याप्रमाणें त्या जीवाचा प्रवेश एकदा झाला, म्हणजे मग पुढील जबाबदारी अर्थात् डोहाळे पुरविण्याची, व सदर स्त्रीच्या मनात उत्तमोत्तम विचार येतील अशी सर्वतोपरी खटपट करण्याची! कारण, त्यावरहि त्या बाल-काच्या भावी उन्नतीच्या सुशिक्षणाची मदार अवलंबून असते, हें विसरून चालणार नाहीं! किंबहुना, मूल गर्भांत असतानाहि शिकू शकतें, हें मत्स्येंद्र-नाथाच्या व अभिमन्यूच्या प्रसिद्ध कथावरून दिसून येणार आहे. मत्स्येंद्र-नाथाना ज्ञान कसे प्राप्त झालें, यासंबधीं ज्ञानेश्वर सांगतात:—

" क्षीरसिंधुपरिसरीं। शक्तीच्या कर्णकुहरीं। नेणो कै श्रीत्रिपुरारी। सांगितलें जें॥ ते क्षीरकल्लोळा आंतु। मकरोदरीं गुप्तु। होता तयाचा हातु। पैठें जाहलें॥." दुसरें उदाहरण अभिमन्यूचें. सुभद्रेच्या गर्भांत असणाऱ्या या बालकानें श्रीकृष्णाच्या तोंडून चक्रव्यूहभेदाची कथा

कशी श्रवण केली, व गोष्ट ऐकता ऐकता सुभद्रेचा डोळा लागला असताहि तो कसा 'हु'कार देत होता, याची कथाहि अशीच अद्भुत व उद्बोधक आहे! पण यापासून कितीकजण बरें बोध घेत असतील? पण विवाहित गृहस्थानीं येथेहि लक्षात ठेवावयाचे तें हेंच कीं, त्याच्या बालकाचें शिक्षण त्याच्या गर्भावस्थेतहि चालू असते! अर्थात् त्यास योग्य ती दिशा दाखवण्याची खबरदारी घेणे, हे त्या कामीं आपलें पवित्र कर्तव्यच ठरत नाहीं काय? असो.

याहिपेक्षा महत्त्वाची शिक्षणाची पायरी सदर मूल जन्मल्यानतर त्याच्या जन्मापासून सुरू होते! बालकाच्या बाल्यावस्थेंत, त्याच्या स्तनधयावस्थेंत मुख्य शिक्षण त्यास त्याच्या आईचेच असते, व तेंहि तिनें 'मदालसे'प्रमाणें "स्तन पाजिता, निजविता, हालविता बालकासि खेळविता" इत्यादि सर्वावस्थेंत दिले पाहिजे, हें उघड आहे! मोहनास्त्रसुलभ अशा त्या बालकाच्या—स्तनधय बालकाच्या मनावर केवळ सद्विचाराचे सदेश जागृतींत आणि सुषुप्तींत, प्रस्फुट वा अस्फुट आवाजात त्याच्या मातेनें त्यास देत राहिलें पाहिजे! त्यानतरच्या त्याच्या बाल्यावस्थेंत व शैशवावस्थेत त्याच्या भावनाप्रधान हृदयावर शिवाजीबाजीसारख्या वीराचीं, रामकृष्णादिकामारख्या अवतारी पुरुषाचीं आणि रामदास—तुकारामासारख्या साधुसताचीं चरित्रे जितकीं उठावदारपणे रेखाटलीं जातील, तितकीं तीं थोडीच होणार आहेत! जिजाई मातेनें शिवबाला लहानपणीं कशाप्रकारचें शिक्षण दिले होतें, ते सुप्रसिद्ध आहे! आणि पित्यासहि त्या कामी भाग घेता येणार नाहीं, असें थाडेच आहे! यासाठीं उभयविध दंपत्यानीं या कार्नी आपली पराकाष्ठा करून सदर बालकाचे मनावर धर्म, नीति, भक्ति, स्वदेशप्रीति इत्यादि तत्त्वाचे ठसे वरील प्रकारच्या उपायानीं आणि स्वतःच्या प्रत्यक्ष आचरणानीं ठसवीत असावे, एवढेच आमचें त्या कामीं त्याना सागणे आहे!—'स्वतःच्या आचरणानीं' म्हणण्याचे कारण असें कीं, " उपदेशाचे हजार शब्द आणि आचरणाची एकच क्रिया ही सारख्या

योग्यतेची आहेत " अशा अर्थाची शेकडों वचनें साधुसंतांच्या व व कवींच्या ग्रंथांतून पसरलेलीं आपणांस ठाऊक आहेत ! " क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे । " आणि " बोले तैसा चाले । त्याचीं वदावीं पाऊलें ॥ " हे समर्थतुकोबांचे बोल प्रसिद्धच आहेत ! आणि लहानपणीं बालक जसें भावनाप्रधान असतें, तसेंच व तितकेंच ते अनुकरणप्रिय व अनुकरणशील असतें, व त्यांना विचार कमी असतो, हें तत्त्व लक्षांत घेतलें असतां प्रत्यक्ष आचरणाची किमत किती आहे, तें समजून येईल. प्रत्यक्ष आचारावांचून उच्चाराला किमत नाहीं, हा तर सार्वत्रिक सिद्धान्तच आहे, आणि तो इतराप्रमाणेंच मुलांचे बाबतींतहि तितकाच, किंबहुना, वरील कारणपरंपरेमुळे कांकणभर अधिकच लागू पडतो, हें विसरून चालणार नाहीं ! उद्या जर एखादा बाप स्वतः चहाचा कप दररोज दिवसातून चारदां तोंडाला लावून मुलांना मात्र " बाळानो, चहा पिऊं नये बरें ! " असें म्हणू लागला, तर त्याचा कितीसा बरें परिणाम मुलाच्या मनावर होईल ? विड्या फुंकणाऱ्या पालकांचीं मुले त्यांची नक्कल म्हणून सहज विडी तोंडाला लावतांना पुष्कळानीं पाहिलें असेलच ! " बाप तसा बेटा अन् कुंभार तसा लोटा " ही म्हण त्याचीच दर्शक आहे ! असो.

पण याचाच अर्थ आपणांस याठिकाणीं शिशुशिक्षणशास्त्रातील एक मोठे तत्व लक्षांत घेतले पाहिजे; आणि तें म्हणजे हेंच कीं, लहानपणीं मुलांचीं मनें हीं अत्यंत संस्कारक्षम असतात, व त्यांना जसे संस्कार द्यावेत तसे ते घेतात ! त्यांची बुद्धि व त्यांचीं मनें हीं लवचीक झाडाप्रमाणें, मातीच्या गोळ्याप्रमाणे, किंवा शुभ्र कागदाप्रमाणें अथवा मऊ मेणाप्रमाणें मृदु असतात ! " बालपणीं बालांची कोमल तरुतुल्य बुद्धि वाकेल " ही प्रसिद्ध आर्या पहिल्या उपमेची दर्शक व आतांच सांगितलेली " बाप तैसा बेटा " ही म्हण दुसऱ्या उपमेची दर्शक असून, दुसऱ्या दोन उपमाहि तितक्याच खऱ्या आहेत ! अर्थात् आपणांस बागवान अगर माळ्याचें,

कुंभकाराचें, चितान्याचें, व ठसे उमटविणाराचें असें चतुर्विध काम एकाच वेळीं करावें लागणार आहे! या चारी इसमांची भूमिका एकाच वेळीं आपणांस घेता येऊन, मुलांच्या मानसिक व बौद्धिक शिक्षणानें त्यांच्या मनाचा व बुद्धीचा सुंदर वृक्ष निर्माण करून त्यास फलपुष्पभारांनीं मंडित करणें, त्यांच्या देहाचा लोटा शारीरिक शिक्षणाच्या चक्रावर फिरवून त्यास सुश्लिष्ट बनवून कुस्ती, मलखांब, लाठी, बोथाटी, जंबिया इ. गोष्टींच्या भट्टींत भाजून खणखणीत तयार करणे, त्यांच्या मनोरूप फलकावर उत्तमोत्तम तत्वांचीं चित्रें रेखाटणें व त्यांच्या बुद्धिरूप मेणावर सद्विचाराचे ठसे उमटविणें, इत्यादि कामें आपणांस एकाचवेळीं करण्याची मौज अनुभवण्यास सापडणार आहे! देशाच्या चालू परिस्थितीकडे लक्ष देतां, त्यांतल्या त्यात प्रत्येक गृहस्थानें आपल्या भावी पिढीच्या शारीरिक शिक्षणाची अवश्य काळजी घेतली पाहिजे, असें सांगितल्या वाचून आमच्यानें राहवत नाहीं; आणि कोणच्याहि स्थितीत म्हटलें, तरी शरीर हें सर्व शिक्षणाचा पाया आहे, शरीराच्या पायावरच भावी आयुष्याची सर्व इमारत उभी राहत असतें; आणि म्हणूनच—

" धर्मार्थकाममोक्षाणां मूलमुक्तं कलेवरम् "—

म्हणजे चतुर्विध पुरुषार्थ साधनाचें मूळ हें शरीर आहे, असें म्हटलें आहे! अर्थात् तो पायाच जर डळमळीत असेल, आणि तें मूळच जर बळकट नसेल, तर वरची इमारत आणि वरचा वृक्ष हाहि डळमळीतच राहून लवकरच कोसळून पडणार—साध्या धक्यानेंहि तो हादरून जाणार, हें उघड आहे! मग जेथें प्रत्येक दिवशीं दंग्याधोप्याच्या वार्ता कानावर येत आहेत, आणि मगरूर मुसलमान आणि आततायी गुंड यांच्या अत्याचारांचे कहर जिथें दररोज कानीं पडत आहेत, तिथें अगदीं लहानपणापासून सुद्धां मुलांची शारीरिक तयारी किती गुटगुटीत आणि तालीमबाज व लाठीबाज ठेवली पाहिजे बरें? पण आज स्थिति काय आहे?

विशेषतः परदेशाशीं तुलना केल्यास बालमृत्यूचें प्रमाण आपल्या देशांत किती भयंकर आहे, याचा कोणी कधी विचार केला आहे काय? यास कारण जितकें आपलें दारिद्र्य, तितकेंच आपळें अज्ञानहि नाहीं काय? मग याचा आम्ही कधीं विचार करणार?

शेवटचा मुद्दा या मुलाच्या शिक्षणाचे बाबतींत मला एकच सांगायचा आहे तो असा कीं, मुलाची बुद्धी लहानपणीं फार चौकस असते;— 'हें असें का? व तें तसें का?' हा प्रश्न त्याच्या ओठावर नेहेमी नाचत असतो! अर्थात् ही त्याची जिज्ञासा—ही त्या "लेकराची जिज्ञासा" आपण कधींहि त्रासिकपणानें अगर आपल्या अज्ञानानें दाबून न ठेवतां अगर त्याची भलतीच समजूत करून न देता, त्याच्या प्रश्नाचें योग्य तें उत्तर आपण दिलें पाहिजे, अथवा, आपल्याला ठाऊक नसल्यास तसें स्पष्ट कबूल करण्यासहि आपण लाजता कामा नये! उलट त्याची जिज्ञासा प्रदीप्त कशी होईल, व ती पुरी कशी करता येईल, याचाच विचार व याचाच निदिध्यास आपण अहर्निश धरला पाहिजे; उमलणाऱ्या फुलाची माळी जितकी काळजी घेतो, तितक्या काळजीनें आपण हें काम केलें पाहिजे, व त्याकामीं त्याला "आनंदा" सारखीं मासिकें पुरवून "आनंद" दिला पाहिजे, तरच आपले घर हें "सानंद" होईल, हें लक्षात टेवा!

ही "लेंकराची जिज्ञासा" पुरविण्याचे कामीं कविवर्य टिळकाचें "लेंकरांची जिज्ञासा" नामक पद्य फारच उत्कृष्ट आहे! त्यातील वेंचक भाग खालीं देत आहे, तो वाचून प्रत्येक गृहस्थानें सतत मनन करावा, अशा योग्यतेचा आहे. टिळक म्हणतातः—"हा बाळ पाहुन अनेकविधा पदार्थां। नाचे हंसे पुसतसे वडिलास अर्था। जिज्ञासु हा सकल विश्व शिकावयाला। तो धन्य! तो सुकृति! जो शिकवील याला॥ ही अल्पशी निरखुनि हंसतो शलाका। छायेस पाहुन घरी मनिं फार धाका। हा पाखरा-

सह करी मधु भाषणाला। तो धन्य! तो सुकृति! जो शिकवील याला॥ "हें काय" देव वदिलें म्हणतात बाऊ। तें चित्त निर्मळ धरीत तसाच भावू। वाढो सुबुद्धिकलिका, अथवा बिचारी। हो जीर्ण अगिंच तरी न कुणी विचारी!॥ हे फूल पाहत असे उमलावयाला। हें चद्रबिंब चढतें उदयाचलाला॥ बाहेर अंकुर निघों बघतो द्रुमाचा। होतो विकास शिशुंच्या मृदु मानसाचा!॥ जो होऊनी अनिळ हें फुलवील फूल। सारील दूर शशिचें घन मेघजाल। कीं अंकुरास जल जो पुरवील माळी। तो धन्य यत्करगता शिशुबुद्धि झाली!॥"

याप्रमाणे बालकाच्या बुद्धीचे वैभव जो हरघडीला खुलवील, झुलवील आणि डोलवील तो खरोखरच धन्य—त्रिवार धन्य नव्हे काय? कारण, प्रत्येक गृहात भावी पिढीचे आधारस्तभ अशीं बालकें याप्रमाणें सुशिक्षणजलाने पुनीत होत राहिली तर मग अजून काय पाहिजे? आणि मग अशा देशाचा उद्धार होण्यास तरी कितीसा वेळ लागणार आहे? यातार्टीच कविवर्य टिळक शेवटीं म्हणतात:—

> "जरि असेल रसज्ञपणा पुरा।
> जरि परोपकृतीच मनोहरा।
> जरि असे चतुरत्व तरी मुला।
> शिकविण्यासम छंद नसे भला!॥"—

तें किती खरें आहे बरें? तरी गृहस्थहो, तुम्ही आपल्या बालकाचे खरे खरे शिक्षक बना, व त्यांच्या बुद्धिरूप पुष्पांकुरास जळ पुरवून एखाद्या बागवानाप्रमाणें हीं "गृहाच्या बगीच्यांतील फुलें" सारखीं फुलत राहतील असें करा! कारण, यांचीच मोहनमाळा गुंफून तुम्हाला जनताजनार्दनाचे चरणीं वहावयाची आहे, हें विसरू नका! पण मुलाची जिज्ञासा केवळ शाब्दिक समाधानानेंच न पुरविता त्यांच्या प्रत्यक्ष प्रयोगीकरणाच्या हस्तव्यवसायबुद्धीलाहि जागृत

करून योग्य तें उत्तेजन व वाव द्या, म्हणजे त्यांच्या ठिकाणीं असलेल्या बाल्यावस्थेंतील घडामोडीच्या बुद्धीची भूकहि शमविल्याप्रमाणें होऊन, आज आपल्या देशास ज्याची वाण आहे अशा मोठमोठ्या शास्त्रज्ञांची पैदास भावी कालांत होण्याचें श्रेय तुम्हांस प्राप्त होईल, व तें श्रेय प्रत्येक पित्यानें व विशेषतः श्रीमंत पित्यानें तर अवश्य घ्यावें, हेंच माझें त्या कामीं तुम्हांस अखेरचें सांगणे आहे! कारण स्वदेशाच्या उद्धारांत, चालू जगाच्या झटापटींत, त्याचें महत्व फार आहे, हें विसरून कसें चालेल? चला तर, लागा पाहूं आतां त्या कार्याला!

——

## नक्षत्र ४ थें

# इतर सुखें

आतापर्यंत गृहस्थाश्रम धन्य व्हावयाला लागणाऱ्या साधनातून स्वगृहाविषयीं आवड, प्रेम व अभिमान, गृहलक्ष्मीचा मानसन्मान, आणि गृहाच्या बगीच्यातील फुलाची फुलावट, अशीं तीन साधने सांगितलीं. याशिवाय सदर गृहस्थाश्रम धन्य करावयाला व संसारात सुख प्राप्त व्हावयाला इतरहि बरींच साधनें आहेत, त्याचा क्रमशः उल्लेख करून त्या सर्व साधनात श्रेष्ठ साधन, आणि विशेषतः ससारात ज्यावाचून पदोपदीं नडवणूक होते, अपमान होतो, हाल होतात, व नानाप्रकारच्या यातना भोगाव्या लागतात, आणि ज्याच्या जोरावर अथवा ज्याच्या अवलबनानें ह्या सर्व हाल, यातना, त्रास व दुःखे चुकविता येतात, इतकेंच नव्हे, तर जगातील बहुतेक सर्व सुखावी पैदास करता येऊन आनदात आणि सुखात कालक्रमणा करता येते, व याशिवायहि ज्याचे दुसरे मोठमोठे उपयोग आहेत, असें साधनाचें साधन, अथवा सर्व साधनाचें सार मी माझ्या प्रिय वाचकाना शेवटीं सागणार आहे! तरी पुढील गोष्टीकडे आता सावधान चित्ताने लक्ष द्यावे!

पैकीं पहिली गोष्ट आरोग्याची होय! संपत्ति आणि शरीरसंपत्ति याची तुलना केल्यास पहिलीपेक्षा दुसरीच श्रेष्ठ ठरते! कारण, शरिराच्या अतर्गत भागातील सुखदुःखें हीं संपत्तीच्या कमीअधिकपणावर अवलबून नसून, नैसर्गिक आरोग्यावर व धडधाकट प्रकृतीवर अवलंबून असतात! साध्या दगडाच्या फरशीवर मोलमजुरी करून आणि चटणीभाकरी खाऊन निजणाऱ्या धडधाकट शरिराच्या मजुराला जें शात निद्रासौख्य आणि उत्तम प्रकृतीचा जो सहजानंद लाभतो, तो पचपक्वान्नाचीं ताटें दररोज फस्त करणाऱ्या आणि छप्परपलंगावरील ढोपराइतक्या उंच

गाद्यागिरद्यावर लोळून त्याची सुखशय्या करू पाहाणाऱ्या मोठमोठ्या श्रीमतांना, अमीरउमरावाना आणि राजेमहाराजानाहि प्राप्त होऊं शकत नाहीं, हें पाहिलें म्हणजे या शरीरसपत्तीचें व आरोग्याचें महत्व किती आहे हें तेव्हाच लक्षात येतें! यासाठींच "Heatlh is wealth" अशी म्हण इग्रजींत पडली आहे! असो.

यानतर दुसरी गोष्ट म्हणजे सद्वासनेची होय! मनुष्य कितीहि श्रीमत असला, कितीहि निकोप प्रकृतीचा असला, किंवा कितीहि बुद्धिमान असला, तरी त्याच्या ठिकाणीं एक सद्वासना नसेल, तर, कांहीं काळ जरी त्याला आपल्या सपत्तीच्या, सुदृढ शरीर प्रकृतीच्या आणि अलोट बुद्धिमत्तेच्या जोरावर सर्व जगास झुलविता आलें, तरी केव्हाना केव्हा तरी त्याच्या पापाचा घडा भरून त्याला आपल्या पापाचें प्रायश्चित भोगावेंच लागतें, हें रशियांतील रासपुटीनसारख्या इसमाच्या उदाहरणावरून आजहि सिद्ध होत आहे! पुराणकालीन रावण, दुर्योधन आणि इतिहासकालीन संभाजी याचींच उदाहरणें असून, त्यांच्या त्रैलोक्य विजयी पराक्रमाची, अपार बुद्धिमत्तेची, अलोट सामर्थ्याची आणि अफाट सपत्तिची सुद्धा जिथें माती झाली, आणि त्यांना धुळीचे दिवे खावे लागले, तिथे सामान्य आणि लुग्या सुग्या जीवांनीं त्या दुर्वासनाच्या भरीस पडूं नये, हेंच बरें! गृहस्थाश्रमाची धन्यता आणि ससाराचे सुख हे सद्वासनात आणि निर्व्यसनीपणांतच भरलेले आहे, हें प्रत्येकानें लक्षांत ठेवावें! तारुण्याच्या गुर्मीत, संपत्तीच्या धुंदींत, सुदरपणाच्या मोहात आणि अधिकाराच्या चेंदलपणांत सारासार विचाराची फारकत होऊन जुगार, वेश्या, दारु इत्यादि निरनिराळ्या व्यसनांचे पायीं पुष्कळ लोक आपल्या शरिराचें मातेरें आणि शीलाचें खोबरें करून टाकतात आणि संपत्तीचें दिवाळें वाजवितात, असा आपणांस या संसारात हरघडी प्रत्यय येतो! यासाठीं आपण सर्व गृहस्थाश्रमीयांनीं त्यापासून सावध रहावे व साध्या, सरळ, प्रामाणिक आणि निर्व्यसनी रहाणींतच खरे सुख भरलें आहे, तें व्यसनाच्या घाणींत

कधींहि सांपडावयाचें नाहीं, हें सदैव लक्षांत ठेवून त्याप्रमाणें वागणूक करावी, तरच आपला गृहस्थाश्रम धन्य होऊन आपणास या संसारांत सुख लागेल!

याशिवाय चाकरनोकर, गाड्याघोडीं, वस्त्रप्रावरणें, घरदार आणि शेतवाडी याचीहि लयलूट करावी असें सुखाभिलाषी कोणा जीवास वाटणार नाहीं! सकाळपासून संध्याकाळपर्यंत आणि उजाडेपासून मावळेपर्यंत प्रत्येक कामात अष्टौप्रहर स्वतःच जातीनें मरमर मरावें आणि विश्रांतीच्या सुखाचा एक क्षणहि ठावा नसावा, असें कोण्या माऊलीस व कोण्या बापास वाटेल? भिकार भाड्याच्या टीचभर घरात उदराधुर्शीचा नंगा नाच सदैव चालू असतां आणि ढेकूण, डास, पिसवा यांनीं सळो का पळो करून सोडले असता त्यातच मुलाबाळाच्या लेंकुरवाळ्या आईला आपल्या फाटक्या तुटक्या वस्त्रानिशीं आपली, आपल्या मुलाची व आपल्या गृहस्वामीची अब्रू कशीबशी सभाळीत सर्वकाळ कामाची उलाघाल करावी लागली असता, त्या तशा दुःखाच्या साम्राज्यात कितीसें बरें सुख लागणार आहे? नाटक, सिनेमा, सर्कस, संमेलनें, सभा, पुस्तकें, मासिकें वगैरे कुठल्याहि प्रकारची सुखाची कल्पनासुद्धा जिथे भयप्रद होते व मुलांच्या आणि आपल्या साध्या गरजा पुरविण्यासाठीं सुद्धा जिथें पैशांची विवंचना अहर्निश चित्ताला जाळीत असते, तेथें कुठल्या हौशी आणि कुठला सुखाचा लवलेश तरी दृष्टीस पडायला? मोठमोठ्या श्रीमंतांच्या येथील विविध गोष्टींचीं वर्णनें वाचून, ऐकून व पाहून मनाला त्याचा हेवा वाटावा, व तशा प्रकारची संपत्ति आपणांस कधीं प्राप्त होईल व आपणहि तशा रीतीनें सुखांत कधीं राहूं अशा प्रकारची तळमळ उत्पन्न व्हावी, यांत कांहीं पाप आहे काय? स्वतःच्या अंगात द्रव्यार्जनाची धमक नसलेल्या साधूनें वरकरणी परमार्थाचा आव आणून पण आतून 'द्राक्षें आंबट' ह्या म्हणीप्रमाणें प्रशस्त, भव्य व सुन्दर अशा

घरादारादिकांस नांवें ठेवलेलीं पाहून खरोखर कोणाहि सांसारिकांस चीड आल्यावाचून रहाणार नाहीं! उंदरांच्या बिळासारख्या घरांत स्वतःचा संसार करून त्यातच समाधानाचें नसतें सोंग आणणाऱ्या या ' बुवा 'च्या मनातहि वरील सुखाविषयीं अभिलाषा नसते असें नसून, उलट तशा-प्रकारचें क्वचित् कांहीं सुख प्राप्त झाल्यास, त्यांत त्यास आनंदच वाटत असतो! मग या परमार्थाच्या नसत्या गप्पा कशाला? काय मोठमोठ्या हवेल्यांतले तेवढेच लोक मरतात आणि उंदराच्या बिळासारख्या टीचभर जागेंत रहाणारे लोक अजरामर होतात, असें थोडेंच आहे? आणि दोघां-नाहि जर सारखाच मृत्यूच्या विशाल उदरात प्रवेश करावयाचा आहे, तर ऐहिक जीवनाची विशाल वर्षें त्यानीं प्रशस्त राजवाड्यात आणि सर्वप्रकारच्या सुखसोयींत का घालवूं नयेत, हें समजणें कठिण आहे! उलट आम्ही तर म्हणतो कीं, भगवान् श्रीकृष्णाप्रमाणें उत्तुंग प्रासाद, उंची वस्त्रप्रावरणें व उत्तमोत्तम साखरशाल्योदनादि मधुर अन्नाचें सेवन, इत्यादि सर्व ऐहिक सुखाची मौज लुटूनहि राजा जनकाप्रमाणें त्यापासून अलिप्त रहावें, यातच जीवनाच्या रहाणीचें खरें रहस्य भरलेलें आहे व ऐहिक रहाणीची खरी मौज आहे! स्वामी विवेकानंदानीं म्हटल्याप्रमाणें " आधीं वैभव मिळवा व मग त्याचा त्याग करा, तरच तुमच्या त्या त्यागाला कांहींतरी किंमत येणार आहे, " हेंच खरें नव्हे काय? याशिवाय संपत्तीचे इतरहि उपयोग आहेत; ते कोणते, व द्रव्य आणि द्रव्यार्जन यांची या संसारात कशी आवश्यकता आहे, यासंबंधीं सविस्तर विवेचन मी माझ्या पुढच्या महत्त्वाच्या प्रकरणांतच करण्याचें ठरविलें आहे, तरी आतां आपण तिकडेच वळूं!

———

## नक्षत्र ५ वें

# श्रीमंतीचा राजमार्ग !

खरोखर निर्धनता ही किती कठिण अवस्था आहे बरें ? तिजसंबंधीं एक कवि म्हणतो--

" निर्द्रव्या पुरुषा न बंधु भजती, त्या मान कोठें नसे।
जाता तो धनिच्या गृहा कुशलही त्याला न कोणी पुसे।
एकामागुनि एक एक फिरतीं लाजोनि वस्त्राविणें।
वाटे निर्धनता महा कठिण ही, हा धिक् तयाचें जिणें ! ॥ "--

ते किती खरे आहे बरें ? जगातल्या गरिबाच्याकडे आणि गरीब श्रीमताच्या नात्याकडे दृष्टिक्षेप केल्यास आपणास वरील श्लोकातील प्रत्येक शब्दन्‌शब्द खरा असल्याचें प्रत्ययास येत नाहीं काय ? त्या गरीब बापड्या जीवाला त्याचे आप्तइष्टहि विचारीत नाहींत; फार काय, पण " स्त्रियः परीक्षा तु निर्धने पुंसि " या वचनाप्रमाणें, अथवा " तयाची भार्याही बहुतकरूनी त्यास छळिते " या कव्युक्तिप्रमाणें प्रत्यक्ष त्याची भार्यासुद्धा त्यास छळण्यास तयार होते, असाहि देखावा आपण कोठें काठें पाहतों ! एकदरींत, " सुखाचे सागाती सर्वही मिळती । दुःख होता जाती निघोनिया ॥ " ही समर्थ रामदासोक्तीच खरी आहे, असेंच आपणास जगातल्या बाजारात दिसून येत नाहीं काय ? आईबाप, बंधुबांधव, बायकापोरें हीं सर्व पैशासाठीं भुकेलीं असतात ! पैसे मिळवणाऱ्या मुलावरच बाप प्रेम करतो ! एकंदरींत प्रेमाच्या बाबतींतहि केवळ पैशामुळें हा पंक्तिप्रपंच आपणांस दिसून येतो ! ही जर खुद्द घरची स्थिति, तर बाहेर पडल्यावर तर मग काय विचारावयासच नको ! त्या बिचाऱ्याला कोणी मान देत नाहीं, कोणी नमस्कार करीत नाहीं, किंवा कोणी ' या, बसा 'हि म्हणत नाहीं ! त्याला काय भावना नाहींत, की

विचार नाही, का मान नाही ? पण हें सर्व असूनहि आपला होणारा सर्व अपमान, छळ, आणि निंदा त्यास मुकाट्यानें सहन करावी लागते, कारण एक त्याची निर्धनता ! काय करतो बापडा ! होतील ते अपमान, होईल तो छळ आणि कानीं पडेल ती निंदा त्यास मुकाट्यानें गिळावी लागते ! खरोखर, चारुदत्तानें म्हटल्याप्रमाणे हें दारिद्र्याचें दुःख मरणाहूनहि अधिक तापदायक आहे, यात शंका नाहीं ! आपल्या मित्राजवळ यासंबंधी त्यानें काढलेले उद्गार मोठे हृदयस्पर्शी आणि वाचनीय आहेत ! तो म्हणतो:—

" मरण बरें वाटतें । मित्रा, दारिद्र्याहूनि तें ॥ ध्रु० ॥ दुःख एकदा त्या मरणाचें । परि होतें जें दारिद्र्याचे । सततचि तें जाळितें ! ॥१॥ मित्रा, मरण बरें वाटतें ते ! "—अर्थात दारिद्र्यावस्था म्हणजे क्षणाक्षणाला तें जिवत मरणच होय, यात तिळमात्र शंका नाहीं ! त्या गरिबाच्या दारिद्र्यदुःखाचा सहानुभूतिपूर्वक विचार करणारा महात्मा त्याच्या आप्तेष्टात आणि सग्या-सोयऱ्यांत एखादाच निघतो ! बाकीचे सर्व त्याची कुचेष्टा, टवाळी, आणि निंदा उघड वा गुप्तरीतीनें करणारे, आणि खोट्या सहानुभूतीचा वरून कोरडा आव आणणारेच असतात, हें खुद्द त्या निर्धनिकासहि कळत नाही असें नाहीं; पण गरिबीपुढें काय करतो बिचारा ?

याच्याच उलट आपण श्रीमंताकडे पाहिले असता आपणास काय दृष्टीस पडते ?—

" यस्यास्तिवित्त स नरः कुलीनः ।
स पंडितः सः श्रुतिमान् गुणज्ञः ॥
स एव वक्ता स च दर्शनीयः ।
सर्वे गुणाः कांचनमाश्रयन्ते ॥ १ ॥ "—

या प्रसिद्ध सुभाषितांत सांगितल्याप्रमाणें ज्याच्याजवळ द्रव्याची उब आहे, तो कोणच्याहि कुळांतला असो, मूर्ख असो, त्याला काहीं बोलता

येत नसो, किंवा त्याचें रूप आणि वयहि वाखाणण्यासारखें नसो; तरीहि तो उत्तम कुळातला, महा पंडित, मोठा विद्वान, बोलण्यात हुशार आणि थेरडा असला तरी तरुण, आणि कुरूप असला तरी सुरूप असाच सर्व जगाला—अर्थात् त्यातील कार्यसाधू, व स्वार्थी लोकाना—दिसत असतो! आणि असे लोकच या जगात शेकडा नव्याणव असतात, हें विसरून कसें चालेल?

पण अशा खोट्या खुषमस्कऱ्याची हाजी हाजी नको असली, नव्हे, त्याची आपणाला चीड असली, तरी इतरहि कारणांसाठीं द्रव्य मिळविणें कसें जरूर आहे, तेंच मी आता सागणार आहे! पण तसें सागण्यापूर्वी मला एक गोष्ट पुन्हा पुन्हा माझ्या गृहस्थवाचकाच्या मनावर बिंबवावयाची आहे व ती हीच कीं, द्रव्याला वाजवीपेक्षा फाजील मान जगानें देऊं नये असें असतानाहि तें तसें देतें ही गोष्ट सोडून दिली, तरी मान मिळण्याचीं जी साधनें या जगात आहेत त्यात द्रव्याचेंहि एक साधन आहे एवढी तरी गोष्ट प्रत्येकानें निखालस कबूल केलीच पाहिजे! आणि तसा मान त्या इसमाच्या अगर त्याच्या पूर्वजाच्या बौद्धिक अगर शारीरिक कर्तबगारीचें दृश्य फल, म्हणजेच मूर्तिमत त्याच्या राजलक्ष्मीचे चित्र, अशा भावनेनीं दिल्यास त्यात वावगे तरी काय आहे? आता प्रामाणिक प्रयत्नाची पराकाष्ठा करूनहि केवळ दैवाच्या उलट्या फाशाने काहींजण दरिद्री राहतात, ही गोष्ट खरी आहे. तरी पण सपत्तीला दिला जाणारा मान हेंच दाखवितो कीं, "द्रव्य मिळवा आणि श्रीमंत व्हा!"—अर्थात् अर्थप्राप्तीसाठीं ही एक महत्वाकाक्षेच्या चुरशीला समाजाने वावच ठेवली आहे, असें म्हणण्यास काय हरकत आहे? मात्र ही चुरस प्रामाणिक प्रयत्नाचीच असली पाहिजे, हें उघड आहे!

पण मानमरातबाचा बाह्य डौल सोडून दिला, तरी खुद्द संसाराच्या वाढत्या पसाऱ्याला, आणि तेंहि अशा भयकर महागाईच्या काळात, काय थोडा पैसा लागत असतो? आणि प्रेम, काव्य, रसिकता, विद्वत्ता इत्यादि गोष्टी

खरी चांगल्या असल्या, तरी प्रत्यक्ष खाद्यपेयें, वस्त्रप्रावरणें, आणि रहाणें-सवरणें ह्याचा प्रश्न उत्पन्न झाला असतां, खण् खण् वाजणारे नाणेंच तिथें पाहिजे असतें-द्रव्यावाचून त्या गोष्टी लटक्या पडतात, हें विसरून चालणार नाहीं. भूक लागली असता तत्वज्ञान खाऊन जगता येत नाहीं, अथवा, तहानेने घसा कोरडा पडला असता काव्यरसाने तो शात करता येणें शक्य नाहीं. तहानभूक हरविण्याचें सामर्थ्यहि काव्यात आहे, पण तें कायमचें नसून अल्पकाळ टिकणारे आहे. केवळ काव्यामृतावर अथवा काव्यरसावर कायमचा कोणी जीवंत राहिला, असे कधीं होईल काय ? शक्यच नाहीं ! म्हणूनच—

" बुभुक्षितैर्व्याकरण न भुज्यते । पिपासितैर्काव्यरसो न पीयते ॥ " अशाप्रकारचीं वचने व्यावहारिकानीं अमलात आणलीं आहेत आणि तीं अक्षरशः सत्यहि आहेत, हे जगातल्या आयुष्यातील प्रत्येक दिवस आपणास अधिकाधिक पटवून देत आहे ! फार काय, पण--

" पोटापुरतें देइ, मागणें लइ नाहीं ॥ " असें म्हणून कां होईना, पण पोटापुरतें तरी साधुसंतांनासुद्धा देवाजवळ मागणें मागावें लागते ! तर मग वाचक, तुमचा आमचा तेथे काय पाड ? सुदामदेवाला श्रीकृष्णाकडे व द्रोणाचार्यांना द्रुपदाकडे जावें लागलें, यावरून हीच गोष्ट दिसून येते कीं, " विनाश्रयैर्नशोभन्ते पडिता वनिता लताः " ह्या वचनांतील स्त्री आणि लताप्रमाणेंच जगातलें पाडित्य आणि काव्य यानाहि आश्रय, अर्थात् संपत्तीचा आश्रय, शोभेसाठींच नव्हे, तर प्रत्यक्ष स्वतःच्या जीवनासाठीहि लागत असतो ! म्हणूनच " प्रपचीं पाहिजे सुवर्ण । " असें रामदासानीं त्याचें हद्दत मागेच सागून ठेवले आहे ! प्रपंचात पैशावाचून चालवू म्हणणें, म्हणजे " रामावाचून रामायण ऐकू " असे म्हणण्याइतकेंच हास्यास्पद आहे ! इतकेंच नव्हे, तर म्हातारपणीं हातपाय थकले असतां आणि गात्रें विगलित झालीं असता जी कष्टदशा येते, त्या वेळेस इष्टमित्रच

केवळ नव्हेत, तर खुद्द मुलेंलेकरें आणि स्वतःची बाईलसुद्धां कशी त्रासते, उबगते, आणि कटाळा करते, हें पाहिलें म्हणजे, अशा वेळींहि सुखाची सोय दाखविणारा एक पैसाच होय, हें आपण लक्षात ठेवलें पाहिजे ! आणि तसे ठेवलें म्हणजे––" धनेभ्यः परो बाधवो नास्ति लोके । धनान्यर्जयध्व धनान्यर्जयध्वम् ॥ "–ह्या उपदेशातील मर्म आपल्या गळीं तेव्हाच उतरणार आहे !

येणेप्रमाणें, स्वतःच्या ससारांत मनुष्याला समजूं लागल्यापासून तों मृत्यूकालापर्यंत धनाचा किती उपयोग होतो, हे येथवर सागून झालें. अर्थात्––" पिंडीं तें ब्रह्मांडीं "–या न्यायानें जी एका व्यक्तीच्या ससारातील गोष्ट, तीच एका देशाच्या प्रपचाची कथा आहे, हें विसरून चालणार नाहीं ! अनाथविद्यार्थीगृहासारखीं गृहें, अनाथबालिकाश्रमासारख्या सस्था, पतितपरावर्तन आणि शुद्धिसघटनसारख्या चळवळी, अस्पृश्योद्धार, रुग्णालयें इत्यादि विविध स्वरूपाचीं कार्यें आणि चळवळी या सर्वांना पैशाची किती जरुर असते, आणि त्यावाचून तीं कार्यें कशीं अडून पडतात, हे तज्ज्ञावाचून इतरांस कळणें कठिण आहे ! त्याच्या करुणकथा आपण वाचल्या, म्हणजे त्याना सहाजीकच मदत करावी असें आपणांस वाटतें ! पण आपणासच खाण्याची भ्रांत असल्यास आपण त्याना मदत ती काय करणार ? तेव्हां त्या दृष्टीनेंहि द्रव्यार्जन करणें हें आपले कर्तव्यच ठरत नाहीं काय ? तसेंच व्यक्तिविषयक दृष्टीनें पाहता, मागें गृहलक्ष्मीचा मान " भूषणाच्छादनाशनैः " म्हणजे वस्त्रालंकारादिकानीं ठेवावयास सागितलें आहे, तसेंच त्याच्या पुढच्या प्रकरणात गृहाच्या बगीच्यातील फुलांची फुलावट–म्हणजेच आपल्या घरातील मुलाच्या शिक्षणाची खुलावट–दिलखुलाशीनें करण्यास सांगितलें आहे, त्यांसहि द्रव्याची आवश्यकता नाहीं, असे कोण म्हणेल ? एकंदरींत, कोणच्याहि दृष्टीनें पाहिलें तरी, स्वार्थासाठीं वा परार्थासाठीं, आपल्याकरिता वा लोकांकरिता, द्रव्यार्जनाची आवश्यकता आणि––" धनान्यर्जयध्वं

धनान्यर्जयध्वम् ॥ " या मंत्राच्या गंभीर उपदेश आजकाल आपल्या समाजाला किती जरुर आहे, हेंच दिसून येते ! माझ्या अल्पमतीप्रमाणें मी तो केला आहे. सर्व सद्गृहस्थ वाचकानीं त्याचा विचार करून योग्य तो बोध घ्यावा, तरच त्याचा गृहस्थाश्रम धन्य होऊन त्याना ससारात सुख लागेल, यात शका नाहीं ! आता सदर सुखाला बोचणारा एकच काटा राहिला व तो म्हणजे " विभक्त का एकत्र ? " याचा होय. पण त्याचा विचार आता आपण पुढील प्रकरणातच करू म्हणजे झाले !



नक्षत्र ६ वें

## विभक्त कीं एकत्र ?

गेल्या पाच प्रकरणातून रेखाटल्याप्रमाणें जेथें अत्यत उदात्त असें गृह आहे व जेथे मनपसत भार्येशीं विवाह होऊन तिच्या मानसन्मानास योग्य वाव आहे, तसेंच जेथील मुलें गृहाच्या बगीच्यातील फुलाप्रमाणें उत्फुल्ल असून सर्वांच्या विकासाची सारखीच काळजी वहाणारे सहृदय बागवान् म्हणजेच पालक ज्या बागेत आहेत, व द्रव्याच्या आयातीचीहि योग्य व सर्वांना सतोषकारक व्यवस्था चालू आहे, आणि एकाच हाताची जशीं पाच बोटें त्याप्रमाणें इतक्या मुलाबाळांनीं व लहानथोर व्यक्तींनीं गजबजलेलें घर असूनहि जिथें :—

" भिन्न फुलाचें संमेलन हें उपवन चेतोहारी।
भिन्न मुलाचे समेलन हे गृह आमुचें सुखकारी॥
भिन्न सुराचें समेलन हें मनोहारि सगीत।
भिन्नागाचें मधु समेलन सौंदर्य प्रख्यात॥ "–

अर्थात् " भिन्नमूर्तींमाधिं एकचित्त जेथे। " अशा प्रकारचा थाट असून,–

" जिच्या स्पर्शे मृतालाही नवें चैतन्य लाधावें।
जिच्या स्पर्शे अहा मूकें नव्या गानांत रगावें॥
सदा स्वर्गी रमे तो हो जया लागे हिचा ठाव। "–

अशा प्रेमाच्या 'जादू'नें सर्व जीव जेथें भारावलेले आहेत व ऐक्याचें सगीत जिथे सदा सुरू असून, मनमोकळेपणा, सहृदयता इत्यादि उच्च व मनोज्ञ गुणांची वसति असून योग्य त्या आदराची भर ज्यांत पडली आहे अशा गृहाच्या 'एकीची बेकी' व्हावी असें कोणच्या सहृदय रसिकांस वाटेल ? पण अशीं भाग्यवान् घरें या भूलोकावर किती आहेत याचाहि

विचार करणे जरूर आहे. आणि याप्रमाणे पाहतां, भूवर स्वर्ग आणणारीं अशीं दिव्य गृहें या जगात फारच थोडीं असून, प्रेमाचा ओलावा पुसून गेलेला व उण्यादुण्या बोलण्यांची खैरात जिथे अहर्निश चालू आहे, अशींच गृहें आपणास, वरकरणी एकीचा आव दाखविणारीं, पण आतमध्यें वरील कारणाच्या किडीनें पोखरून निघालेलीं व निघत असलेलीं अशीच आपणास बहुतेक सर्वत्र दृष्टीस पडतात! मनुष्याचीं फुफुसें बिघडलीं नाहींत तोंवर त्यानें कोणच्याहि हवेंत राहिले तरी एकवेळ चालेल; पण तीं बिघडतातशीं दिसल्यावर त्यानें तावडतोब दूषित हवेचा त्याग करून शुद्ध हवेंत रहावयास जाणेंच जसें इष्ट व हितपरिणामी ठरतें, तसेंच निर्मळ,मोकळया व दिलदार मनाचें प्रेम, हें प्रत्येक गृहाचें काळीज आहे! पण वर सांगितलेल्या कारणानें त्या काळजालाच एकदा हात घातला गेला, कीं एकत्र निवासाची कोंदट हवा सोडून, विभक्त राहणीच्या शुद्ध हवेतच त्याने जाऊन राहिलें पाहिजे! वर प्रथम रंगविलेल्या उदात्त चित्रातील प्रेम म्हणजे प्रत्यक्ष परमेश्वरस्वरूप आहे. पण त्या नारायणाला अंतराय होऊ लागला तर––

> " नारायणीं जेणें घडे अंतराय। हो का बापमाय त्यजावी ते॥
> प्रल्हादें जनक बिभीषणें बंधु। वधा माता निंदू भरतें केली॥ "

असें तुकोबाचें दृष्टांतासकट त्याकामीं सांगणें आहे! अर्थात् ज्या ठिकाणीं अशा थोर प्रेमाला वंचित होण्याचा प्रसंग, अथवा, त्याच्या भलत्याच उलट्या ढोंगाचे दुष्परिणाम अनुभवास येऊं लागले, व जिथे सरलता सुटून उच्चनीच भेदाचीं भुतें जिथे नंगानाच घालूं लागलीं, व स्वार्थ, मद, मत्सरादि घुबडाचा जिथे घुघुत्कार सुरू झाला, त्या घराचा भुताटकीच्या घराप्रमाणें आपण त्यागच केला पाहिजे! ज्यांना त्यांतच आनंद व धन्यता वाटत असेल, त्यांनी खुशाल तेथें राहावें! त्याला ना कुणाची आहे! पण कोणाहि सुखाभिलाषी सद्गृहस्थानें नसत्या लौकिकाच्या कल्पनेस बळी पडून आपल्या संसाराची होळी करून घेऊं

नये, एवढेच आमचें त्याकामीं नवविवाहितांना सांगणें आहे! कारण, आम्ही आमच्या 'कविसंसार' नाटकांतील पांचव्या अंकाच्या दुसऱ्या प्रवेशांत म्हटल्याप्रमाणे संकुचित हृदय, लोभी अथवा चिक्कु वृत्ति आणि प्रेम व ज्ञानलालसा यांचा अभाव, अशा कोंदट हवेचें वातावरणच मोठमोठ्या श्रीमंतांच्या घरांतहि पुष्कळदां काहींतरी गोड आत्मवचनेखालीं दृष्टीस पडते! अर्थात्, केवळ वरवरच्या चांगल्या खाण्यापिण्यास मिळण्याने खरा कार्यभाग होत नाहीं, हें उघड आहे! कारण, तसें असते तर सर्व श्रीमंतांची घरें म्हणजे सुखाची आगरें झाली असतीं! पण सूक्ष्मपणें अवलोकन केल्यास, रस्त्यावरील भणग भिकाऱ्यास जें सौख्य आहे, तेंहि तेथें दृष्टीस पडत नाहीं! याचें कारण "भाकरीच्या कोळशातहि अमृताचा झरा उत्पन्न करणारी दिव्य शक्ति" ज्या प्रेमात—ज्या दिव्य अलौकिक प्रेमांत आहे, त्या प्रेमाचा शुद्ध वायु तेथें वाहत नसून, वर सांगितलेल्या विविध मनोवृत्तींचे दूषित वायूच तेथें वहात असतात! अर्थात् "अशा कोंदट वातावरणांतील सुखमय दुःखापेक्षां, स्वतंत्र वातावरणांतील साध्या मीठभाकरीचें दुःखमय सुखच जास्त बरें नव्हे काय?" या प्रश्नास "केव्हांहि बरें!" असेंच कोणीहि विचारी जीव उत्तर देईल, आणि आम्ही तरी तेंच सांगत आहों! यासाठीं, एकत्र असायचें का विभक्त वसायचें, ह्याचा विचार प्रत्येक सद्गृहस्थानें आपापल्या परिस्थितीप्रमाणे स्वतःशींच ठरविणें उचित होणार आहे. त्यांत एकत्र राहाणाराला आम्ही हेंच सांगूं कीं, "बाबारे, स्वतंत्र राहिलें असतां जितका तुला आनंद होईल, तितकाच आनंद इथेंहि वाटत असल्यास खुशाल एकत्र रहा—नव्हे, जरूर एकत्र रहा!" आणि विभक्त रहाणारांनाहि आम्ही एवढेंच म्हणूं कीं, "वरीलप्रमाणे दुखावलेले जीव तुम्ही आहांत काय? मग जन्मभर त्याच खाईंत लोळण्यापेक्षां खुशाल स्वतंत्र रहा, व मागील प्रकरणांत सांगितलेलीं व पुढील प्रकरणांतून सांगितलीं जाणारीं कर्तव्यें नीट रीतीनें बजावण्यास सिद्ध व्हा!"—कारण, केवळ एकत्र राह-

ण्याचा कसाबसा देखावा करणें हीच कांहीं जन्माची इतिकर्तव्यता नव्हे! खरी इतिकर्तव्यता कोणची, तें मी आतापर्यंत सांगत आलोंच आहे, आणि पुढेंहि सांगणार आहे! सांगण्याचा आशय इतकाच कीं, वाचकहो, गृहस्थाश्रमातील सुखाच्या फळाला टोंकरणारी ही कीड "चले जाव सोटा" प्रमाणें विचाराच्या एकाच घावात तुम्हीं नाहींशी करून टाका, व यापुढील लेखनाच्या वाचनास व विचारास सिद्ध व्हा!

---

नक्षत्र ७ वें.

## पुरुषार्थत्रयीचें परिपालन !

" त्रिवर्गाचा सोपान सिद्ध केला ।
जगन्नाथे, तो दिला मानवाला ।–"

—कविवर्य टिळक.

वरील अवतरणांतील "त्रिवर्ग" शब्दावर टीप देतांना 'अर्थ, काम, मुक्ति' असा अर्थ "टिळकाची कविता" या पुस्तकाच्या संपादकांनीं दिला आहे. खुद्द कविच्या मनांत हाच अर्थ होता कीं काय, तें आम्हास ठाऊक नाहीं. तथापि, सदर ओळी ज्या गृहाचे वर्णनात आल्या आहेत, त्या गृहांतील गृहस्थाश्रमात मुख्यत्वेकरून साध्य करावयाची पुरुषार्थत्रयी—म्हणजे "त्रिवर्ग"—जर कोणची असेल तर ती "धर्म, अर्थ, व काम" ह्याचीच आहे आणि म्हणूनच गृहस्थाश्रमात पाऊल टाकताना "धर्मेच, अर्थेच, कामेच" ( नातिचरामि ) अशी तीन गोष्टीबद्दल पति शपथ घेत असतो, या गोष्टीचा सदर सपादकास विसर पडलासें दिसतें ! बरें, मोक्षसाधन जर गृहात होतें, तर धर्मसाधन काय गृहाच्या बाहेर होतें ? एकवेळ चतुर्विधपुरुषार्थाचें मूळ हें गृह आहे असें म्हटलें तरी चालेल; पण त्यात पुरुषार्थत्रयीच आणायची असेल, तर वरील संपादकांनी दिलेली न आणता आपल्या आर्यांच्या विवाहप्रसंगींच्या शपथेचीच आणली पाहिजे, हे क्षणैक विचारान्तीं कोणासहि पटणार आहे ! कारण, मोक्षाच्या मार्गावर पतिपत्नी हें नातेंच केवळ नव्हे, तर स्त्रीपुरुष हा भेदहि रहात नाहीं. अर्थात् सदर साधन हें प्रत्येक व्यक्तीनें स्वतःशीं करावयाचें असून त्यास जगाचा संपर्क लागतां कामा नये; थोडक्यांत म्हणजे, तें अद्वैतावस्थेंतलें साधन असून पहिली तीन द्वैतातली आहेत—मग त्या द्वैतांतहि अद्वैत पहाण्याची मौज तुम्ही कितीहि करा ! असो. यासाठीं पुरुषार्थ-

त्रयीचा त्रिवर्ग म्हणजे धर्म, अर्थ व काम हाच होय, हें यावरून उघड होत आहे, व ह्या त्रयीचें परिपालन कसें काय करायचें अथवा करावें, तेंच आतां आपणांस पहावयाचें आहे! तरी त्याचा आता आपण क्रमशः विचार करूं!

पुरुषार्थत्रयीपैकीं पहिली गोष्ट धर्माची होय. "धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा।" या वचनाप्रमाणें सर्व जगाच्या प्रपंचाचें मूळ हा धर्मच होय यात शंका नाहीं! धर्माचा निर्बंध तुटल्यास मनुष्य अथवा मनुष्यसमाज हळुहळू पशूच्या अवस्थेंत जातो, व सरतेशेवटीं त्याचा विनाश हटकून होतोच होतो, हें जगाच्या इतिहासातील नामशेष झालेल्या कित्येक राष्ट्रांच्या इतिहासावरून आपणास दिसून येणार आहे! मनुष्य आणि पशु यामधील अंतर केवळ या धर्मामुळें, अथवा, त्या धर्माचें ज्ञान देणाऱ्या बुद्धीमुळेंच पडलें आहे ही गोष्ट "धर्मोहि तेषामधिकोविशेषो। धर्मेण हीनाः पशुभिः समानाः॥" या वचनावरून सिद्ध होत आहे, आणि सूक्ष्म अवलोकन केल्यास आहार, निद्रा, भय, मैथुनादि व्यवहारामध्ये धर्महीन मनुष्याची वागणूक पशुतुल्य असते, आणि मनुष्याचें मनुष्यपण त्या कामीं योग्य ते धार्मिक निर्बंध घालून घेऊन ते यथाशक्ति पाळण्यातच दिसून येतें, असें म्हणावयास हरकत नाहीं! अर्थात् "आचारप्रभवो धर्मः।" या वचनाप्रमाणें उपरिनिर्दिष्ट गोष्टी या मुख्यत्वेंकरून आचारधर्माच्या असून, त्याबरहुकूम करावयाची वागणूक मनुष्याच्या जन्मापासून ते मृत्युपर्यंत त्यानें केलीच पाहिजे, तरच त्यात त्याचें मनुष्यपण दिसून येणार आहे, हें उघड आहे! यासंबंधी अधिक सविस्तर विवेचन आमच्या 'भारतवर्षाच्या धार्मिक इतिहासां'तील १९ व २० या भागांत, चालू काळच्या प्रश्नाचा विचार करतांना आम्ही दिलेलें आहे. जिज्ञासूंनी तें अवश्य वाचून पाहावें. विस्तारभयास्तव तें सर्वच येथें देतां येत नाहीं; तथापि, मुद्यांपुरतें विवेचन वर केलेंच आहे! असो.

"शतायुर्वैपुरुषः" अथवा "कुर्वन्नवेह कर्माणि जिजीविषेत् शतं समाः" या वचनाप्रमाणें मनुष्याची कलियुगातील आयुष्यमर्यादा १०० वर्षांची ठरलेली आहे. आता १०० वर्षें जगण्याचें भाग्य फारच थोड्या व्यक्तींना लाभतें; तथापि, आश्रमव्यवस्था ज्याप्रमाणें मनुष्याचें वय शंभर वर्षें धरूनच दर २५ वर्षांस एक, याप्रमाणें चतुराश्रमात्मक बसविलेली आहे, त्याचप्रमाणे त्या त्या आश्रमधर्माला अनुसरून मुख्यत्वेंकरून-समर्थांच्या खालील बिनमोल ओवींतील वचनाप्रमाणें क्रमशः वागणूक व्हावी, असें आम्हांस वाटतें. तें वचन म्हणजे—

"आधीं तें करावें कर्म। कर्म मार्गें उपासना।
उपासका सांपडे ज्ञान। ज्ञानें मोक्षचि पावणें॥"—

हेंच होय! यामध्यें समर्थांनी मनुष्याच्या मानसशास्त्राचा आणि शारीर-शास्त्राचा किती उत्तम अभ्यास केलेला आहे, हेंच दिसून येतें! मनुष्याच्या वाढत्या वयाबरोबर ज्याप्रमाणें त्याचे कपडे बदलतात, व लहानपणचा पोशाक मोठेपणीं चालूं शकत नाहीं, त्याप्रमाणेंच मानसिक वाढीचीहि गोष्ट आहे! वाढत्या वयाबरोबर अनुभवानें, अवलोकनानें, विचारानें, मनुष्याची मानसिक प्रकृतीहि बदलत जाते, व त्याच्या जन्मजात गुणांत आणि मनोविकारांतहि फरक होत जातात. लहानपणच्या हूड वृत्तींना, सैरावैरा धावणाऱ्या इंद्रियांना आणि थै थै नाचणाऱ्या मनाला, एका विशिष्ट दिशेने नाचायला, बसायला, उठायला शिकवावें, त्याला एक विशिष्ट तऱ्हेचें वळण लागावें, आणि त्यांतच जाता जाता ईश्वराराधनाहि घडावी, यासाठींच संध्या, नमस्कारादि ब्रह्मकर्में नित्यकर्मांचे रूपानें प्रत्येक ब्रह्मचारी बटूच्या मागें लाविलेलीं असतात! तसेंच 'अमुक करूं नये' आणि 'तमुक करावें' या नियमावलीचा बोरहि ह्या वेळेस हेतुपुरस्सर आणि बुद्धिपूर्वक त्याचे मागें लाविलेला असतो. आणि तो या वयापुरताच मर्यादित असावा, हेंच उचित होय! कारण, आधुनिक शिक्षणशास्त्राच्या

दृष्टीनें पहातांहि, लहान मुलाची प्रवृत्ति ही कांहींतरी ' करण्याकडे ' गुत लेली असते ! अर्थात् त्याचें त्यावेळचें बहुतेक जीवन कर्मकाडात्मक असते आणि म्हणूनच त्या जीवनास अनुरूप अशी "आधीं ते करावे कर्म।" ही समर्थांच्या ओवींतील पहिली ओळ आहे ! अर्थात् ह्या ठिकाणीं आचारध आणि कर्मकाड यामध्ये आम्ही सूक्ष्म भेद करीत आहोत, हें चाणाक्ष वाचकाच्या लक्षात आलेंच असेल ! असो.

वर सांगितलेल्या समर्थांच्या ओवींत समर्थांनीं केवळ एका व्यक्ती च्याच नव्हे, तर सर्व समाजाच्या आयुष्यांतील चतुर्विधावस्थेचें व तदनुरू त्याच्या कर्मांचें अथवा वागण्याचें वर्णन केलेले आहे, हें आर्यांच्या धार्मि इतिहासाच्या ग्रंथांचें म्हणजे वेदोपनिषदांचें सूक्ष्मावलोकन करणारा तेव्हांच कळून येणार आहे ! अर्थात् ज्या पायरीने समाजाची परिणा झाली, त्या पायरीनेच त्यातील प्रत्येक घटकावयवाची म्हणजे प्रत्येक व्यक्ती चीहि परिणति व्हावी, हेच उचित आणि योग्य आहे, सध्या चालू आं आणि पुढेंहि होत रहाणार, हें निःसंशय आहे ! मग कोणी कांहींहि म्हणो त्याला कसलेंहि नाव देवो, अथवा त्याविरुद्ध कसलाहि प्रयत्न करो ! पर अशी गोष्ट असताना, या निसर्गधर्माविरुद्ध जाऊन, जन्मभर कर्मे करीत बसा, आणि बालपणचीं लेणीं लेऊन बालपणचीं खेळणींच जन्मभ खेळत बसा, असें सांगणाऱ्या कर्मठाच्या कर्मकटकटीचे आणि किंचि विचारसरणीचें मात्र हसू आल्यावाचून रहात नाहीं ! असो.

कर्मप्रधान ब्रह्मचर्याश्रमांतून गृहस्थाश्रमात—गार्हस्थ्यात—पाऊल टाव तांना आणि टाकल्यावर आपणांस असें दिसून येतें कीं, कर्मकांडाचीं लहानपणचीं बंधनें लहानपणच्या आंगरख्याच्या बंदाप्रमाणेंच अगदीं सह तुटून आणि गळून पडत आहेत, व बाह्य शारिराची हालचाल आ कर्मकांडाची धडपड हळूहळूं स्थिरावत आणि थडावत आहे; कार अंतर्यामी परमेश्वराच्या भक्तीचा आणि उपासनेचा उदय झा

असून, त्या भावनेनीं वेड्या झालेल्या जीवाचीं गात्रें पुलकित होत आहेत, त्यावर हर्षरोमाच उठत आहेत, अष्टसात्विक भाव दाटत आहेत, आणि मनाचा लय त्या सावळ्या रूपाकडे, त्या सुदर ध्यानाकडे, त्या 'विठू कानड्या 'कडे लागला असतांना शरिराची जी कांहीं हालचाल होत असेल, ती फक्त त्या भक्तिभावाची आणि भजनमहोत्सवाचीच होय! त्यापुढें स्नानसध्यादि कर्मेंच काय, पण उच्चनीच आणि स्पृश्यास्पृश्य हे भेदहि विरून जातात, आणि सुखाची पढरी, चद्रभागेतीरीं, पुंडलिकाशेजारीं पिकत असते! अर्थात् ह्याच भक्तिसुखाचे पान तुम्ही करा, कर्मकाडाचा समुद्र घुसळून त्यातून काढलेल्या ह्या नामामृताचे आणि भक्तिसुधारसाचे घोटच तुम्ही या गृहस्थाश्रमात घ्या, असेंच समर्थ रामदास स्वामी आपणास त्याच्या वरील दिव्य ओवींतील द्वितीय चरणात सागत आहेत, ते योग्यच आहे! मात्र ह्या भक्तिभावाचा आणि उपासनेचा अर्थ आपण सकुचित घेतां कामा नये, तर—

" He prayeth best who loveth best
All things both great and small !"

या आंग्लवचनाप्रमाणे, अथवा, " भक्ति म्हणजे सर्वांभूतीं। सप्रेम भजनयुक्ती ॥ " ह्या नाथोक्तीप्रमाणें खऱ्या भक्ताची अवस्था आपलें ठिकाणीं हळूंहळू बाणली पाहिजे, तरच प्रस्तुत गृहस्थाश्रमांतील आपलें धार्मिक कर्तव्यकर्म जें 'उपासना', तें आपण यथायोग्य रीतीनें पार पाडले, असें होणार आहे! यासबंधीं, म्हणजे ह्या उपासनेच्या मार्गांबद्दल, आम्ही आमच्या " सायुज्य-सोपाना "तील ४ ते ८ या प्रकरणामधून भरपूर आणि सविस्तर विवेचन केलेंच आहे! आणि कामापुरतें त्याचें सार येथें जरी थोडक्यांत वर दिलें असलें, तरी अधिक वाचनाची हौस आणि जिज्ञासा ज्या भाग्यवान् वाचकांना असेल, त्यानीं तें तेथें पहावें, एवढें सांगून आतां मी पुरुषार्थत्रयींतील दुसऱ्या भागाकडे, म्हणजे अर्थाकडे वळतों !

'अर्थ' या शब्दाचा अर्थ द्रव्य किंवा धन असा आहे, आणि पारमार्थिक दृष्ट्या शंकराचार्यांच्या म्हणण्याप्रमाणें 'अर्थ' हा जरी 'अनर्थ'-कारक असला, तरी ऐहिकदृष्ट्या "प्रपचीं पाहिजे सुवर्ण" म्हणजे संसारात अर्थ लागत असतो, तरच त्या संसारात अर्थ असतो; नाहींतर तो संसार शब्दशः च नव्हे, तर अर्थशःहि निरर्थकच होतो यात शंका नाहीं! या 'अर्था'ची म्हणजे धनाची अथवा द्रव्याची आवश्यकता आपल्या संसाराला किती आहे, याचें विवेचन "श्रीमंतीचा राजमार्ग" या माझ्या मागील एका प्रकरणात भरपूर आलेलेंच आहे! प्रस्तुत प्रकरणात हा अर्थ कसा प्राप्त करून घ्यावा, म्हणजे द्रव्यार्जन कोणच्या मार्गानें करावें, व त्याचा व्यय कसा करावा, या दोन गोष्टींचाच आपणास विचार कर्तव्य आहे! पैकीं पहिली गोष्ट अर्जनाची म्हणजे मिळविण्याची! जगात द्रव्याच्या राशि मिळविणाराचा इतिहास जर आपण पाहिला तर आपणास काय बरें दिसून येतें? सन्मार्गानें, न्यायानें, नीतीनें, कोणाचाहि घातपात न करता अथवा शिव्याशाप आणि तळतळाट न घेता पैसे मिळवून श्रीमंत झालेल्याची उदाहरणें आपणास जगाच्या राजकीय आणि सामाजिक इतिहासात आणि जीवनात किती बरें पहावयास सांपडतात? फारच थोडीं, फारच विरळा, हेंच ह्याचें उत्तर नव्हे काय? सर्वोच्च धर्माचा वारसा सांगणाऱ्या खुद्द आपल्या देशात या कामीं आजकाल किती अधःपात झालेला आहे, व त्याकामीं धनलोभ्याकडून जनता किती गांजून गेलेली आहे, हें हरघडीला आपण पहातच आहोंत! पण असें का व्हावें याचें कारणच पाहूं गेल्यास, धनवंताची दृष्टीच याकामीं चुकलेली आहे, असें दिसून येतें—असें म्हणावें लागतें! कारण, त्यावर बिनतोड उत्तर एकच कीं, जर लांडीलबाडी, घातपात, अन्याय व जुलूमजबरदस्ती यावाचून द्रव्यच मिळविणें शक्य नसतें, दुसऱ्याचें शिव्याशाप आणि तळतळाट घेतल्यावांचून लक्ष्मीचें पाऊल आपल्या घरात पडणें जर अशक्यच असतें, तर मग त्याच लक्ष्मीला सरळ, न्यायाच्या, नीतीच्या, धर्माच्या, आणि सचोटीच्या मार्गानें मिरवीत आणून मोठ्या मानसन्मानानें आणि

आदरपूर्वक तिची प्रतिष्ठापना आपल्या घरात करणारे जे कांहीं अल्पस्वल्प म्हणजे थोडेबहुत महात्मे आपणास प्रस्तुत समाजांत दृष्टीस पडतात, ते कधींच दृष्टीस पडले नसते, हे उघड नव्हे काय ? पण ते दृष्टीस पडतात याचाच अर्थ बाकीच्या धनवताची त्याकामीं दृष्टि चुकलेली आहे, असाच होत नाहीं काय ? नसत्या लोभाला फाटा देऊन, सन्मार्गानें चालण्याचा निश्चय केला, म्हणजे मायेचा त्याग केलेल्या व वैराग्याचा आश्रय केलेल्या पारमार्थिकाप्रमाणेंच—" वस्तु सर्वत्र संचली । दृष्टि विश्वाची चुकली ॥ "—असाच आपणास अनुभव येणार आहे ! व्यापारात योग्य तो फायदा मिळविणें याला कोणी नाहीं म्हणत नाहीं. कारण, उघड उघड फायद्यासाठीं आणि द्रव्यार्जनाकरिताच तुम्ही व्यापार करावयास बसलेले आहा, हे सर्व जगाला माहीत आहे, ठाऊक आहे. पण नसत्या " लोभाचें माजर " बनून " लोभमूलानिपापानि " ला वश व्हायचे, व " दाढीला झोका देण्या "सारख्या नीच कर्माला दीडदमडीच्या अन्याय्य फायद्यासाठीं प्रवृत्त होऊन 'मढयाच्या टाळूवरील लोणी चाटणाऱ्या' कुत्र्याप्रमाणें स्वतांचें पोट वाटेल त्या उपायानें जाळायला तयार व्हायचें, त्यापेक्षा त्यात काटे भरलेले काय वाईट—काटे का भरू नयेत ! या महानीचपणाला काय नाव द्यावें बरें ? जिवंत मढयाच्या गळ्यात स्वतःच्या सुकुमार बालिकेला बाधून त्याच्या मोबदल्यात मिळणाऱ्या हजारों रुपयावर हवेल्या उठवण्यापेक्षा, त्या पोरीच्या गळ्यात गळा घालून दोघानींहि एकदमच विहिरींत उडी घेतलेली काय वाईट ? पण अशी एक एक अन्यायाचीं, अनीतीचीं आणि तळतळाटाचीं उदाहरणें देत बसल्यास ती यादी कितीतरी लांबेल ! त्यात सांगण्याचा भाग इतकाच कीं, अशा तऱ्हेचें वर्तन मनुष्याचे हातून होण्याला—( १ ) आपल्या आत्मस्वरूपाचा विसर ( २ ) आपल्या मर्त्यपणाच्या जाणिवेचा अभाव ( ३ ) ईश्वरी भयाची भीति नसणें ( ४ ) पाषाणहृदयीपणा अथवा निर्घृणता आणि ( ५ ) नीतिमार्गावरील अचल निष्ठेचा अभाव, हीच कारणें होत असतात, यांत शंका नाहीं !

यातील एकाहि गोष्टीची जाणीव जर मनुष्याला होईल, व त्यानें त्याचा ऊर जर भरून जाईल,तर त्याच्या हातून अनुचित कर्म केव्हांहि होणार नाहीं! कारण, कोणच्याहि अनुचित कर्माला हेंच कारणपंचक कारण होत असतें, हें सर्वांनीं लक्षांत ठेवलें पाहिजे! त्या कारणपंचकांतील प्रत्येकाचा विचार वेगवेगळा असा आतां थोडक्यांत करूं. पैकीं, पहिली गोष्ट 'आत्मस्वरुपाचा विसर' ही होय! खरोखरी, 'अंतरिच्या ज्ञानदिव्या'च्या ज्योतीवरील कोळीष्टक झाडून, तो प्रज्वलित करून, आपल्या हृदयमंदिरांत पाहिल्यास, प्रत्येकाला आपण अमूपवैभवाचे आणि अलोट शांति-सुखाचे धनी आहोंत, असाच अनुभव येईल, आणि आपली मायेनें मोहित झालेल्या अज्ञानावस्थेंतली 'भीकमागी' लोभीवृत्तीची कृति, म्हणजे जन्मानें राजा असून त्याच्या अज्ञानांत दारोदार भीग मागणाऱ्या भणंग भिकाऱ्याची भाग्यलक्ष्मी भोगण्याची हौस (!) होय, अशीच आपली खात्री पटल्यावांचून रहाणार नाहीं! दुसरी गोष्ट, 'मर्त्यपणाचें विस्मरण' आणि त्यामुळें होणाऱ्या दिशाभुलींतली भुलभुलावणी! "गळ्याला फांस पुरा असुन। अमरपणाचे स्वप्न पाहुनी भुलले मूढ जन!॥" असा कविवर्य टिळक इशारा देतात; पण आजवरच्या साधुसंतांनीं काय थोडे इशारे दिले, तर या टिळकांच्या इशाऱ्यानींच तेवढे या लोकांनीं जागृत व्हावें! असो.

यानंतरचा प्रश्न ईश्वरीभयाचा म्हणजे परमेश्वरी आज्ञा अमुक अमुक आहेत व त्यांच्या परिपालनानें त्यास जितका आनंद होईल, तितकाच क्रोध त्याच्या भंगानें त्यास येणार आहे, या गोष्टीच्या जाणीवेचा होय! त्या राजाधिराज परमेश्वराच्या राज्याची व्यवस्था किती बिनचूक आहे, आणि इथें केलेल्या कृतकर्मांचें आणि पापपुण्याचे झाडे वर कसे चुंबित द्यावे लागतात, व त्या चित्रगुप्ताच्या दरबारांत त्यावांचून कशी सुटका नसते, हें दीडदमडीच्या आयुष्यांतील बुडबुडयाच्या तारुण्यकालच्या स्थायिकतेंत वाटेल तशी बडबड करणाऱ्या क्षुद्र मानवाला काय कळणार! त्याचा मदमत्तपणा इतका उताला जात असतो कीं, "ज्यानें जन्माला

घातलें" त्या प्रभूच्या अस्तित्वाबद्दलच तो शंका घेत असतो! हरहर! उन्मत्तपणाचा हा कोण अधःपात! ह्या बापड्यांना त्याच प्रभूच्या कृपेनें कधीं उपरति होईल तो सुदिन! बाकीच्यांनीं मात्र—

"A just measure is His delight!"

म्हणजे "न्याय्य आणि सरळ ताजव्यासारखी वागणूक, हाच त्या प्रभूचा आनंद होय!" हें लक्षात ठेवावें, व त्याप्रमाणें वागावें, ह्यातच त्याचें कल्याण आहे! असो. आता चौथी गोष्ट 'सहृदयपणाची अथवा घृणेची' होय! खोटे दस्तऐवज, खोटे करारनामे, खोटे कागद, खोटी बोलणी आणि खोटी करणी म्हणजेच थापेबाजी आणि कपटकृति ह्याच्यापायीं ज्या हजारो गरीब जीवांची नागवण करून त्यांचे पैसे, धन, वित्त, आणि शेतवाडी आपण लुबाडायला आणि बुचाडायला पहातो, त्यांनाहि आपल्याप्रमाणेंच बायका-मुलें आणि लेंकरेंबाळें आहेत, आणि त्यांच्या त्या कच्च्याबच्च्यांचा सोन्या-सारखा संसार धुळीला मिळवून त्यांना अन्नान्न करीत दारोदार भीक मागा-यला लावणें, ही निर्घृणतेची परमावधि होय, याची जाणीव उत्पन्न होण्याला आणि खरे सहृदयत्व अंगीं बाणण्याला गृहस्थाश्रमातील आपलें मुख्य धार्मिक कर्तव्य जें उपासना अथवा भक्ति, त्याचा उदयच आपल्या अंतःकरणांत झाला पाहिजे, तरच हें कार्य होणार आहे, हें उघड आहे! असो.

पांचवी गोष्ट 'नीतिमार्गावरील अढळ प्रेमाची, अचल विश्वासाची, व अभंगभक्तीची!' अर्थात् त्या कामीं—

"वानोत निंदोत सुनीतिमत। चळो असो वा कमला गृहात।
हो मृत्यु आजीच घडो युगांतीं। सन्मार्ग टाकूनि भले न जाती! ॥"

अशी छातिठोक नीतिमार्गाची वृत्तिच त्या कामीं आपल्या अंतःकरणांत बाणली पाहिजे, तरच हें कार्य होणार आहे, हें सांगणें नकोच! वास्तविक ज्या देशामध्यें स्वप्नात दिलेलीं वचनें सुद्धां पाळणारे हरिश्चंद्रासारखे धीरो-दात्त नरपुंगव निर्माण झाले, त्याच देशांत उघड उघड जागृतावस्थेंत दिलेलीं वचनेंच नव्हेत, तर केलेले लेखी करार आणि दस्तऐवजहि धाब्यावर बस-

वून, दीडदमडीच्या स्वार्थासाठीं वकिलामार्फत आपली 'केस' कोर्टात मांड-विणारे कज्जेदलाल पाहिले, आणि त्यांचा तो कोर्टातील कलकलाट ऐकला, म्हणजे नैतिक दृष्ट्या आपला किती अधःपात झाला आहे, आणि 'सत्या-परता नाहीं धर्म । सत्य तेंचि परब्रह्म ।। ' या मुक्तेश्वरवचनाचा, अथवा, 'सर्वं सत्ये प्रतिष्ठितम्' या दिव्य उक्तीचा आपणास कसा विसर पडला आहे, हेंच दिसून येते! अर्थात् यातून आपला पुनरुद्धार व्हावयास हवा असेल, तर या सत्याची खरी किंमत ओळखून, सत्यवचन, सत्यभाषण आणि सत्याचरण, यांचाच अवलंब आपण हरघडीला केला पाहिजे, तरच आपला निभाव लागून, आपणास उन्नत दशा प्राप्त होणार आहे, हें उघड आहे ! आणि असें आहे म्हणूनच—

"जोडोनिया धन उत्तम व्यवहारें। उदास विचारें वेंच करी ।। उत्तमचि गति तो एक पावेल । उत्तम भोगील जीवखाणी ।। " असें तुकोबांनीं सांगितलें आहे; आणि गृहस्थाश्रमाच्या धन्यतादर्शक श्लोकामध्यें सुद्धां ज्या गोष्टींची जरूरी आहे म्हणून सांगितलेलें आहे, त्यांत साध्या धनाची जरूरी न सांगतां 'सुधनं' म्हणजे 'सुमार्गेण प्राप्तं धन ' याचीच महती गाइलेली आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे ! असो. आतां तुकोबांनीं या द्रव्याच्या आयव्ययासंबधानें जे उद्गार काढलेले आहेत त्यांतील "जोडोनिया धन उत्तम व्यवहारें।" याचा येथवर विचार झाला ! आतां त्यांतील उत्तरभागाकडे म्हणजे "उदास विचारें वेंच करी ।। " याकडे, म्हणजेच आपल्या पराक्रमाच्या आणि अक्कलहुशारीच्या जोरावर प्राप्त करून घेतलेल्या 'सुधना'ची विल्हेवाट आपण कशी लावावी, स्वतःच्या उपभोगार्थ ते किती ठेवावें व परोपकारार्थ ते किती खर्चावें, या गोष्टींच्या विचाराकडे आतां आपणांस वळलें पाहिजे ! तर आतां तिकडेच वळूं !

या संपत्तीचा व्यय दोन प्रकारें होत असतो. एक तर स्वतः उपभोग घेऊन, अथवा, दुसऱ्याच्या कामीं लावून, म्हणजेच परोपकारार्थ. या प्रत्येक अंगाचा आता आपण विचार करूं या. पैकीं पहिलें अंग उपभोगाचें.

वास्तविक, संपत्तीचा उपभोग स्वत: किती घ्यावा व इतरास मदतीदाखल तो किती द्यावा यांतील प्रमाणाचा विचार ज्याचा त्यानेंच विचारपूर्वक ठरविला पाहिजे. त्या कामीं परमोच्चबिंदु कोणचा आहे, एवढेंच आम्ही सागू शकू !—आणि मार्गदर्शक होण्यास असे उच्च बिंदूच सहायक होत असतात ! ध्रुव नक्षत्रावर नजर देऊनच समुद्रांतील नावाडी आपली नाव वल्हवीत असतो ! आणि "विवाहितांचें नक्षत्रदर्शन" हे नांव प्रस्तुत पुस्तकास अशाच उच्च ध्येयाच्या नक्षत्रांचे दर्शन घडवून आणावें म्हणूनच दिलेले आहे, हे वाचकांच्या आतां लक्षांत आलेंच असेल ! असो. तर या कामीं परमोच्च बिंदु म्हणजे धनाचाच काय, पण तनुमनाचा सुद्धा परकार्यासाठीं सर्वस्वी त्याग करणें हाच होय ! या कामीं शिबिराजाचें उदाहरण प्रसिद्ध आहे ! एकनाथ, तुकारामादि साधुसंतांचीं व दामाजीनामाजीसारख्या प्रेमळ भगवद्भक्तांचीं चरित्रेंहि आपणांस हेंच तत्त्व प्रतिपादित आहेत ! परतु, इतक्या पल्ल्यापर्यंत सर्वांचीच मजल जाऊन पोंचेल असें नाहीं, आणि घरच्या लोकाना उपाशीं मारून दारच्या लोकांना पोसण्याचें तत्वहि कित्यकांना,—व विशेषत: "Charity begins at home" ह्या आंग्ल वचनाचा अथवा तत्वाचा प्रकाश ज्यांच्या हृदयांत विशेष पडला आहे, त्यांना मान्य होण्यासारखें नाहीं, म्हणून तें आपण सोडून देऊं ! पण त्याच्याचबरोबर "Charit ends with home also" म्हणजे ही दातृत्वबुद्धि घराच्या उंबरठ्यापाशींच विराम पावण्याची प्रवृत्ति जी सध्या आपल्या समाजांत, अगदीं नवकोट नारायणाचे येथेंहि अनेकदा दिसून येते, तो स्वार्थबुद्धीचा चढलेला पारा पाहून मात्र मन उद्विग्न झाल्यावांचून राहत नाहीं ! अमुक अमुक फंडाला अथवा संस्थेला मदत करा, म्हणून जाहीर विनंतिपत्रक प्रसिद्ध करणाऱ्यांच्या सह्याकडे पाहिल्यास, त्यांत कित्येक लक्षाधीशांचीहि गणना झालेली आपण पाहतों, व यांनीं स्वतः त्या कामीं किती धस सोसला, म्हणून पहावें, तर पूज्याच्याच थाट बहुधा दृष्टीस पडतो ! व्यासपीठावरून कोरडी वक्तृत्वबाजी करणारे सरदार आणि संस्थानिकांहि आजवर अनेक झाले, पण हे

स्वतः देशाच्या उद्धारार्थ किती मदत करीत होते तें पाहिलें, म्हणजे 'दर्यामें खसखस' असाच शोचनीय प्रकार दृष्टीस पडत नाहीं काय ? आणि म्हणूनच आदर्श सस्थानिकाचें चरित्र 'नवाशिवोदय' या कादंबरीच्या रूपानें आम्हास रंगवावें लागलें, हें उघड आहे ! असो. वास्तविक आज हजारोच नव्हेत, तर लाखो लोक अन्नावाचून मरत असतां देशातील धनिकांनीं स्वतःच्याच चैनींत दंग रहावें, यापेक्षां आपल्या देशाचें नष्टचर्य तें कोणतें असणार ? याचा अर्थ, तुम्ही आळसाला उत्तेजन द्या, असें लिहिण्याचा आमचा केव्हाही उद्देश नाहीं ! पण अगदीं प्रामाणिकपणानें आपल्या बुद्धीप्रमाणें काम करणारेहि असे हजारो, लाखो जीव आपल्या समाजांत नाहीत काय कीं, ज्याना त्याच्या दुर्दैवामुळें मरमर मरूनहि पुरेसें अन्नवस्त्र, निवाऱ्याची जागा, आणि भाकरतुकडा या गोष्टी मिळत नाहींत ? मग हेंच त्याच्या प्रामाणिक श्रमाचें बक्षिस काय ? अशी स्थिति वास्तविक असूं नये, अगदीं उच्च अशा धार्मिक दृष्टीनेंहि असूं नये;—तर 'आयुष्य हें चैन नसून कर्तव्य आहे' व तें कर्तव्य हेंच कीं, अशा प्रामाणिकपणें कष्ट करणाऱ्या लक्षावधि जीवांना द्रव्याच्या विवंचनेतून मुक्त करणें,—हें धनिकानीं ओळखलें पाहिजे ! त्याचप्रमाणें आंधळे, पागळे, बहिरे, मुके, थोटे, रोगी आणि निराश्रित अशानाहि, योग्य तें काम त्याच्याकडून करून घेऊन कां होईना, पण सहाय्य देणें हेंहि धनिकाचेंच काम नव्हे काय ? आज हजारों अनाथ विद्यार्थी आणि शेंकडों गुणी लोक केवळ द्रव्याभावीं अंधारात खिचपत पडले आहेत, त्याना प्रकाशात आणून, त्यांना सर्वतोपरी साह्य करून त्याच्या गुणकुसुमाना फुलविण्याचें आणि त्यांच्या गुणरत्नाना चमकण्यास अवसर देण्याचें कार्य, हें श्रीमंताचेंच नव्हे काय ? खरोखर, अशीं "मोलाचीं माणिक मोतीं" केवळ ह्या श्रीमंताच्या स्वार्थी कानाडोळयामुळें कितीक हरपून जात असतील, तें एक तो प्रभूच जाणो ! 'ग्रे' नामक एका आंग्ल कवीनें याचें चित्र मोठ्या हृदयस्पर्शी वाणींत आपल्या "इलजी" नामक काव्यांत रेखाटलें आहे, त्यांतील

दोन कविता खालीं देतों. स्मशानभूमिकेंत हिंडतां हिंडतां तो म्हणतो:—

" Perhaps in this neglected spot is laid
Some heart once pregnant with celestial fire;
Hands that the rod of empire might have swayed,
Or waked to ecstacy the living lyre!"
" Full many a gem of purest ray serene
The dark unfathomed caves of ocean bear;
Full many a flower is born to blush unseen
And waste its sweetness on the desert air! "

एकदरींत, अशीं कितीतरी नररत्नें या समाजोदधीच्या अज्ञात अशा कड्याकपाऱ्यांतून झांकून पडलेलीं असतील! तशींच कितीतरी सुंदर व सौगंधिक मानवी कुसुमें अज्ञाततः या समाजोद्यानांत फुसलेलीं असतील! त्या हिऱ्या-मोत्यांचें तेज तसेंच वायां जाणार काय? आणि त्या सौगंधिक पुष्पाचा परिमल, निर्जन अरण्यातील फुलाप्रमाणें, असाच वाया जाणार काय? अरेरे! निष्काळजी, निर्घृण, अरसिक श्रीमतांनों, तुम्ही कधीं इकडे लक्ष देणार?—

" Chill penuary repressed their noble rage,
And froze the genial current of the soul!"

या ' ग्रे'च्या वचनाप्रमाणें दारिद्र्यशीतानें गारठून आणि काकडून जाणाऱ्या त्या बापड्या लेखकाच्या, कवींच्या आणि कादंबरीकारांच्या उच्च महत्त्वाकांक्षा, उच्च विचार, आणि उच्च कल्पना जागच्याजागींच ठार होताना तुम्हास पाहवतात ना? खरोखर—

" उत्पद्यन्ते विलीयन्ते दरिद्राणां मनोरथाः "—

या वचनाप्रमाणें कित्येक दरिद्री जीवांचे, संस्थांचे व कारखान-दाराचे स्वदेश, स्वधर्म व स्वसमाज याच्या कल्याण-विषयक उच्च मनोरथ केवळ या द्रव्याभावामुळें जागच्या जागीं गोठून जात असतील, हें तुम्हांस दिसत नाहीं काय? मग तुम्ही कधीं जागे होणार? आणि कधीं आपल्या कर्तव्यकर्मास लागणार? खरोखर, या सर्व बाबतींतली हिंदुस्तानातील राजे-

रजवाडे, सरदार, दरकदार, जहागीरदार, जमीनदार व श्रीमंत शेट-सावकार आणि बड्या बड्या पगारांचे हुद्देदार, या सर्वांची वर्तणूक पाहिली, आणि एकीकडे हजारों, लाखोंच नव्हेत, तर कोट्यवधि गरीब जनतेचा मूक टाहो ऐकला, म्हणजे चित्त कसें भरून येतें आणि ' समाज सत्तावादी ' लोकांचें म्हणणें चित्ताळा पटून, सर्व भांडवलशाहीविरुद्ध ते साहजिकच बंड करूं लागतें! परतु असा प्रसंग येऊ नये, यासाठींच आपल्या धर्मानें स्वार्थत्यागाच्या परमावधीला सद्‌गुणाच्या अत्युच्च शिखरावर नेऊन बसविलें आहे ! किंबहुना,—

" श्लोकार्धेन प्रवक्ष्यामि यदुक्तं ग्रंथकोटिभिः ।
परोपकारः पुण्याय, पापाय परपीडनम् ! ॥ "—

अशा प्रकारचे श्लोक आपल्या इकडे प्रसिद्ध आहेत, तेहि हेंच दाखवितात ! त्याचप्रमाणें—

" Give up all and follow the light !–"

अशा प्रकारचा खुद्द ख्रिस्ताचाहि उपदेश आहे, आणिः—

" देवाच्या सख्यत्वाकारणें । आपुलें सौख्य सोडोनि देणें ।
सर्व अर्पावें जीवें प्राणें । प्राण तोही वेचावा ! ॥ "—

अशा प्रकारें समर्थांचा व इतरहि साधुसंताचा उपदेश आपल्याकडे मुबलक आहे;—पण लक्षात कोण घेतो ?

बरें, स्वतःसाठीं घेतल्या जाणाऱ्या उपभोगाकडे आणि चैनीकडे पाहिलें, तरीहि या श्रीमंत धनिकांचा आणि राजेरजवाड्यांचा कल, स्वदेशी-पेक्षां विदेशीकडे, आणि धार्मिक वर्तनापेक्षां अधार्मिक वर्तनाकडेच झुक-लेला असतो, हें पाहिलें असतां मनाला अधिकच वाईट वाटतें ! त्यांच्या त्या विलायतच्या वाऱ्या, त्या विलायती मोटारी, तें विलायती फर्निचर, आणि दारू, वेश्या आणि जुगार, हीं त्यांचीं हरहमेश आदळणारीं व्यसनें पाहिलीं, म्हणजे या विधानाचा प्रत्यय तेव्हांच येणार आहे ! चैन करायची तर ती निदान आपल्या देशाला, धर्माला आणि समाजाला तरी बाधक होणार

नाहीं, येवढा तरी विचार या श्रीमंतांनीं आपल्या मनामध्यें करायला नको काय? पण विचाराचें यांना वावडें असून, त्याची व यांची फारकत झालेली असते, त्याला कोण काय करणार? तथापि, ज्यांच्या डोक्यात अद्याप अत्यल्प तरी विचार शिल्लक असेल, अशा सर्व श्रीमंत धनिकांनीं व इतरहि सामान्य वाचकांनीं यापासून योग्य तो बोध घ्यावा अशी त्यांना प्रार्थना करून, यापुढील तिसऱ्या मुद्याकडे, म्हणजे पुरुषार्थत्रयींतील राहि- लेल्या तिसऱ्या 'कामा'च्या पुरुषार्थाकडे मी आता वळतों.

———

## नक्षत्र ८ वें

# पुरुषार्थत्रयीचें परिपालन (पुढें चालूं)

तिसरा पुरुषार्थ म्हणजे कामाचा पुरुषार्थ! हा पुरुषार्थ असा आहे कीं, त्याला स्त्री व पुरुष, प्रकृति व परमात्मा, अशी जोडगोळी लागत असते! खुद्द या सृष्ट्युत्पत्तीचें शास्त्र पाहिलें तरी तिच्या बुडाशींहि प्रकृतिपुरुषसंयोगच आहे, असेंच आपणास दिसून येणार आहे!—" मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन् गर्भं दधाम्यहं। संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत ॥ "—या प्रसिद्ध भगवद्वाक्यांत हाच अर्थ आलेला आहे! एकदरींत, पुरुषप्रकृतिसंयोग आणि स्त्रीपुरुषसंयोग यांत तत्वतः कांहींच फरक नाहीं! पण मग प्रश्न इतकाच आहे कीं, वरील सृष्ट्युत्पत्तिशास्त्राच्या दृष्टीनें परमेश्वर आपला पिता आणि प्रकृति आपली माता होत असून, आपण सर्व स्त्रीपुरुष जर त्या " एकाच आईचीं बाळें " आहोंत, तर साहाजिकच आपण परस्परनात्याच्या दृष्टीनें बंधुभगिनीच ठरत नाहीं काय? आणि बंधुभगिनींचा विवाह कधीं कोणी पाहिला आहे काय? तो हितपरिणामीं होईल काय? आणि तो अनाचार नव्हे काय?—याच कल्पनेनें भारून जाऊन आणि पारमार्थिक अलिप्ततेच्या महतीसाठींहि—" सर्वथा न करावा स्त्रीसंग " असें "वेदाचें अंतरंग" असल्याबद्दल तुकोबा सांगतात, तर शुक, शंकराचार्य, ज्ञानेश्वर, रामदास, विवेकानंद, रामतीर्थ, रामकृष्ण परमहंस इत्यादि महात्मे, एक तर आजिबात लग्न करीत नाहींत, अथवा, चुकून लग्न आधींच झालें असलें, तरी असंगावस्थेंत जन्मभर आपलें दिव्य आयुष्य व्यतीत करीत असल्याचें, व आपणाबरोबरच आपल्या पत्नीचाहि उद्धार करीत असल्याचें आपण त्यांच्या चरित्रांत वाचतों! पण ही कल्पनेची भरारी आणि आचरणाचें दार्ढ्य सर्वांना थोडेंच साधणार? उलट, मनुष्याच्या मानवी मनांत जे अत्यंत प्रबळ विकार आहेत, त्यांत मूर्धाभिषिक्त विकार ह्या कामाचाच होय! व ह्या पुष्पधन्व्याचा पराक्रम जगाच्या प्रारंभापासून

तों आबतागायत कसा त्रैलोक्यांत अव्याहत चालू आहे, तें पाहिलें म्हणजे मन खरोखर थक्क होतें! रागाच्या सपाट्यांत या छलकाला एकदा शंकरांनीं जाळून खाकहि केला होता! पण अशरीरी झालेल्या ह्या अनंगाच्या भार्येचा म्हणजे रतीचा शोक—तो हृदयद्रावक 'रतिविलाप'—ऐकून भगवान् शंकरांचें चित्त द्रवलें, व त्यांना आपली चूकहि उमगून आली, व त्यांनीं त्याला अशरीरीच,—पण पुन्हा जिवंत केला; पण त्यामुळें तो साहजीकच प्रत्येकाच्या मनात घुसून बसल्यामुळे, व पूर्वी बाहेरून शरसंधान चालवीत असे, ते आतां आंतून मारा सुरू केल्यामुळे, अधिकच अनर्थ माजला आहे! असो. ह्या काव्यकल्पना सोडून देऊन, पुन्हा आपण व्यावहारिक जगांत उतरू या!

वर सांगितलेच आहे कीं, सृष्ट्युत्पत्तिशास्त्राच्या अथवा इतिहासाच्या दृष्टीनें स्त्री-पुरुषसंयोग हा बंधुभगिनींचा संयोग होतो, व ही कल्पना न आवडूनच कित्येक महात्मे आजवर अविवाहित राहत आले! पण अशांची संख्या अत्यल्प आहे, हे उघड आहे! पण प्रश्न असा कीं, ही संख्या अल्प कां? अधिक कां नाहीं? तर 'कामाचें विलसित' प्रत्येकाच्या हृदयांत चालू आहे, व त्याचा प्रतिकार करण्याचें सामर्थ्य फारच थोड्यांच्या ठिकाणीं आहे, हेच याचें उत्तर नव्हे काय? पण हा 'बंधुभगिनी-संयोग' जर परमेश्वरास नको असता, आणि तो खरोखरच अनिष्ट असता, तर परमेश्वराने हा कामविकारच मनुष्याच्या मनात कशाला ठेवला असता? असाहि प्रश्न यावर उत्पन्न होईल; पण "तसा तो ठेऊन त्याला मनुष्याची परीक्षा पहावयाची आहे, व या परीक्षेत किती पास होतात तें पाहून, त्याना सर्वांत जास्त शाबासकी देण्याचें त्यानें ठरविलें आहे!" असा यावर उत्तरपक्षहि साहजीकच केला होईल,—आणि वरील व्यक्तींच्या विचारसरणीच्या दृष्टीनें तो सर्वथैव योग्य आहे ह्यांत शंका नाहीं, आणि खरोखरच पारमार्थिक दृष्ट्या हे विश्व हा प्रभूचा एक खेळ, ही मायेची जादू, हा संसृतिचा पसारा, आणि ही अज्ञानाची वागुरा पसरलेली आहे, ह्यांत

शंका नाहीं ! हा जादूचा खेळ ओळखून, त्या मायेच्या जाळयात न सापडता, थेट प्रभूकडे कोण धाव घेतो, व त्याला आधीं कोण शिवतो, हाच खेळ प्रभु जगाच्या प्रारंभापासून पहात आहे ! अर्थात् असें करायचें म्हणजे, मनानेंच नव्हे, तर शरीरानेंहि ह्या ससृतिपाशात आणि ह्या मायेच्या मोहक पण मारक जाळ्यात न सापडता, तडक जो धूम ठोकील तोच खरोखर श्रेष्ठ नव्हे काय ? पण संसारात गटगळ्या खाणारे कांहीं तत्त्वज्ञानी इथेंहि आपल्या तत्त्वज्ञानाचा दिवा पाजळून असें सागत असतात कीं, ससारापासून पळून जाण्यापेक्षा त्यात राहून व झगडून त्यावर विजय मिळविणें हेंच अधिक पराक्रमाचें व श्रेष्ठ आहे ! पण अशा बुद्धीनें संसारात पडणार किती महात्मे असतील, व त्यातहि जनकश्रीकृणासारखे वीर किती निघतील, याची वानवाच आहे ! बाकीच्याच्या बाबतींत ससाराचा अवलंब म्हणजे आपल्या मदनाशीं झुजण्याच्या कामीं असणाऱ्या नामर्दपणाच्या कबुलीचा ' वुइक पॉइंट ' च होय, ह्यात शंका नाहीं ! पण हें नकळून ते वरील जनकश्रीकृष्णादिकांच्या तत्वज्ञानाच्या उगाच गप्पा मारीत असतात, व "आपण जणूं काय दुसरे जनकश्रीकृष्णच आहोंत !" असें भासविण्याचा प्रयत्न करीत असतात ! पण जनकश्रीकृष्णच काय, पण असा इसम उत्तम गृहस्थाश्रमीहि असत नाहीं, हें त्याच्या इतर वेळच्या वागणुकीवरून व हालचालीवरून—त्याचें सूक्ष्म अवलोकन केल्यास आपणास वऱ्हाच दिसून येणार आहे, व सुवर्णधातूची ही काब न राहता त्याचें खणखण वाजणारे नाणेंहि बनलें नसून, त्यात इतर हिणकसाची बेसुमार भेसळ झाल्यामुळें तें बदबद आवाज देत आहे, व काशीचा आव आणणारे, पण खरोखरी खणखण वाजणारेंहि हें नाणे राहिलें नसून,तो केवळ बदबद वाजणारा ' बुद्‌बुद् लहरी तरंग ' होऊन गेला आहे, असेंच आपणास दिसून येणार आहे ! कारण, खणखण वाजणारे उत्तम गृहस्थाश्रमीयाचें नाणेंहि पैदा होणें हें वाटतें तितकें सोपें नाहीं, हें लक्षात ठेवलें पाहिजे ! हें उत्तम नाणें पैदा झालें असें केव्हां समजायचें ?—अथवा, केव्हां सिद्ध होतें ? तर ज्या वेळेस

शरीरानेंच नव्हे, तर मनानेंसुद्धा परस्त्रीचें चिंतन न होता, केवळ स्वस्त्रीचे ठायींच रति म्हणजे आवड आसक्ती राहील, त्या वेळेसच होय! 'मन गया तो जाना दे, मत जाना दे शरीर' ही त्याच्या खालची पायरी! आणि म्हणूनच अशाप्रकारचा अमूल्य गुण ज्याचे ठायीं आहे, स्वस्त्री-वाचून इतराना जो मनानें सुद्धा मायबहिणीप्रमाणें मानतो, अशा 'गुण-निधी'स भर्तृहरीसारखे कवि वदन करीत असतात, हें त्याच्या "वाछा सज्जनसंगमीं" या श्लोकामध्यें त्यानीं जो 'स्वस्त्रीसुखीं लुब्धता' या गुणाचाहि समावेश केला आहे व अशा 'गुणनिधीं' ना वदन करावें— 'त्या वंदिजे तत्वता असें जें म्हटलें आहे,—त्यावरून उघड दिसत आहे! त्याचप्रमाणें गृहस्थाश्रमाच्या धन्यतादर्शक प्रारंभींच्या प्रकरणात दिलेल्या श्लोकात गृहस्थाश्रम ज्या गोष्टींनी धन्य होतो म्हणून सागितलें आहे, त्या-मध्येंहि 'स्वयोषिति रति :' पाहिजे, किंबहुना, ती असली तरच गृहस्था-श्रमाची धन्यता आहे, 'धन्यो गृहस्थाश्रमः' असे उद्गार आपणास काढता येतील असें म्हटलें आहे, हें लक्षात ठेवलें पाहिजे!—परन्तु एकाहून एक वरचढ अशा उसळत्या सौंदर्याच्या ह्या विश्वमोहिनींत ह्या गुणाची पैदास होणें, हा गुण अगीं बाणणें किती कठिण आहे हें प्रत्येक संसारी जीवाला माहीतच आहे, विशेषतः मनानेंसुद्धा परस्त्रीचें चिंतन व परस्त्रीअभिलाषा न करणें, हें काम किती दुर्घट व किती कठीण आहे, ह्याची जाणीव प्रत्येकाला आहेच! त्यातूनहि धार्मिक यमानियमाचें बधन पाळणारा, पाश्चिमात्य 'रोमान्स' ची चव न चाखलेला, साधाभोळा पण प्रामाणिक वृत्तीचा, आणि सरळ मनाचा व जुन्या वळणाचा गृहस्थ एक वेळ सदर कर्तव्यपालन धर्मांश म्हणून सहज करील;—पण धर्माला धाब्यावर बसवून, लग्नाला कायदेशीर करार मानून, क्षणाक्षणाला काडी-मोड करण्यास तयार होऊं पाहणाऱ्या, किंबहुना मनानें तसें करणाऱ्या आणि पाश्चिमात्य शिक्षणाची आणि कवींच्या काव्याची 'रोमान्स' चाखून 'सौंद-र्योपासने' च्या गोड नांवाखालीं आपल्या पापी आणि व्यभिचारी मनाच्या

नीच विषय वासनला दडवूं पहाणाऱ्या, आणि या फुलावरून त्या फुलावर मधुरसपानार्थ गुंजारव करणाऱ्या नि घिरट्या घालणाऱ्या मुग्धाच्या भ्रमर-वृत्तींत भ्रमणाऱ्या,—निदान मनानें तरी तशा प्रकारच्या गुळचट आशेचे घुटके गिळून त्यांतच आयुष्याची खरी 'मजा' आहे असें मानणाऱ्या मूढ जीवाच्या हातून तें होणें महा दुर्घट आहे, किंबहुना, अशक्य आहे असेंच आपणांस दिसून येणार आहे ! अर्थात् अर्थाप्रमाणेंच ह्या 'कामा'-चे बाबतींतहि धर्माचा निर्बंध असेल, तरच आपली वागणूक चोख होणार आहे, हें उघड आहे ! आणि समाजहिताच्या दृष्टीनेंहि ती तशीच व्हावयास नको काय ? "या कामीं नीतिअनीतिविषयीं मनूनें जो नियम घालून दिला आहे तो असा कीं, प्रत्येक माणसानें ( स्वस्त्रीखेरीज ) वडील स्त्रीस मातेसमान, समवयस्क स्त्रीस भगिनीसमान व लहान स्त्रीस मुलीसमान मानलें पाहिजे ! असें जर सर्व माणसें करतील तर सर्व समाज शुद्ध व निष्कलंक, अतएव सुखी होईल! " हे डॉ. ॲनि बेझंटचे बोल किती चिरस्मरणीय आहेत बरें ! ते प्रत्येकानें आपल्या हृदयावर कोरून ठेवावेत व खऱ्या तिसऱ्या पुरुषार्थाच्या विचारास लागावें, एवढीच आमची सर्वांना विनंति आहे ! शेवटीं, सुप्रजाजननशास्त्राचे कामीं वाचकांना अत्यंत सहाय्यभूत होणारें 'मनोवांछित संतति' नामक मागें उल्लेखिलेलें स्वामी शिवानंदकृत पुस्तक वाचण्याबद्दल पुन्हां एकदां वाचकांना आग्रहाची आणि कळकळीची शिफारस करून, प्रस्तुत विषयांतील राहिलेल्या मुद्यांचा आपण आतां विचार करूं!

प्रथमतः मला हें सांगितलें पाहिजे कीं, परमेश्वर इतका उदारांचा राणा आहे कीं, वर सांगितल्याप्रमाणें विधीनें आणि धर्मानें विषयसेवन करणाऱ्या पुरुषाचे ठायीं स्फुरणारा उज्वल 'काम' मीच आहे—"धर्मा'-विरुद्धो भूतेषु कामोस्मि भरतर्षभ।—" असें त्याचें सांगणें आहे,—कुणालाहि अस्वस्थता वाटूं नये म्हणून त्यानीं कबूली दिली आहे ! अर्थात् "विधीनें सेवन। विषयत्यागांत समान ॥" ही तुकोक्ति त्याचीच दर्शक असून,

" नाम घेतां ग्रासोग्रासीं । तो नर जेविला उपवासी ! ॥" ही ओळ त्याशीं समानार्थकच आहे व " राम म्हणे करिता धंदा । सुखसमाधी त्या सदा ॥ " ही ओळहि त्याच मासल्याची आहे ! त्यांतील मुद्दा असा आहे कीं, अखंड आणि कडकडीत अशा काया-वाचा-मनाच्या आजन्म ब्रह्मचाऱ्यापेक्षां जरी अशा गृहस्थाश्रमीयाची योग्यता अधिक नसली, तरी ईश्वरी प्रेमाचें औदार्य असें कीं, ती त्याच्या बरोबरीची आहे असें प्रभूंनं मनमोकळेपणीं आणि मुक्तकंठानें जाहीर केलें आहे ! आणि त्यांतहि जे जनकश्रीकृष्णादिकांसारखे असतील, त्याची योग्यता तर त्याहूनहि श्रेष्ठ आहे असें भगवतानीं भगवद्गीतेंत चक्क सांगूनच टाकलें आहे ! पण कोण कुणापेक्षां श्रेष्ठ, हा वाद-- आपण तज्ज्ञाकडे सोपवून देऊन, आपण आपल्या पुढल्या विचारास लागूं या !

आतां, स्त्रीसंग किती करावा, याचा विचार करतांना ज्याप्रमाणें द्रव्याच्या बाबतींत तें आत्मोपभोगार्थ किती घ्यावें, व त्याच्या त्यागाचा परमोच्च बिंदू कोणता तें सांगून, ज्याचें त्यानें तें ठरविण्यास सांगितलें, तसेंच ' मुळींच स्त्रीसंग करूं नये; टाळता आल्यास तो अजिबात टाळावा ' ह्या परमोच्च बिंदूच्या टोकापासून सुरवात करून, त्याचें प्रमाण ज्याचें त्यांनीं ठरवावें, असेंच येथेंहि आम्ही सांगत आहोंत ! मात्र त्यांत सुप्रजाजननशास्त्राचे सर्व नियम पाळून, मुलगा अगर मुलगी हवी असेल त्याप्रमाणें, शास्त्रांत सांगितलेल्या त्या त्या दिवशींच स्त्रीसमागम करून अवश्य अनुभव घेऊन पहावा. तसेंच स्वामी शिवानंदानीं म्हटल्याप्रमाणें " सिंहासारखा उमदा म्हणजे धीरोदात्त, शूर, व बलवान् असा पुत्र हवा असेल, तर सिंहाप्रमाणेंच वर्षांतून एकदाच योग्य कालीं व योग्य रीतीनें समागम करावा " व तसा ' सर्वदमना ' सारखा पुत्र होतो कीं नाहीं, तें अवश्य पहावें--निदान चालू प्रयोगांच्या युगांत तरी ह्या कुतूहलास्पद प्रयोगास कुणी हटूं नये, असें आम्हांस वाटतें ! पण अशा प्रकारचें नियमव्रत पाळणें, हेंहि दररोज विषय-

सुखाला चटावलेल्या आम्हाला सोपें नाहीं, हें लक्षात ठेवलें पाहिजे! यासाठीं अतिविषयी गृहस्थांनीं हळुहळु ह्या कामाला जिंकून, त्याला प्रथम ठराविक दिवसांच्या रूळावर घालावें,व मग त्याहून मनोजय वाढवीत वाढवीत, अंतिमपद अथवा अंतिम अवस्था जी पूर्ण निवृत्ति ती साधावी, असेंच आमचें ह्या कामीं सर्व सद्गृहस्थाना सागणें आहे! कारण, विषयाच्या अधिकाअधिक सेवनानें ही निवृत्ति होईल—हा विषयाचा धगधगणारा अग्नि शांत होईल—अशी खुळी आशा करणें फार चुकीचें आहे! पूर्वीच्या लोकांनीं अनुभव घेऊन हा ठाम सिद्धान्त जगाला जाहीर केला आहे कीं:—

"न जातु कामः कामानामुपभोगेन श्याम्यति।
हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते!॥"—

म्हणून वरीलप्रमाणें हळूहळू कां होईना,पण पूर्व निवृत्ति साधावी! अर्थात् ही निवृति देवऋण, पितृऋण व ऋषिऋण ह्या तीन ऋणापैकीं पितृऋणांतून मुक्त होऊन मगच साधावी, हें उघड आहे! असो.

याप्रमाणें धर्म, अर्थ, व काम, ह्या तीन पुरुषार्थांचें प्रतिपादन येथवर माझ्या मतिप्रमाणें मीं केलें. त्यावरून ह्या 'पुरुषार्थत्रयीचें परिपालना'त आपणांस प्रामुख्यानें ही गोष्ट दिसून आलीच असेल कीं, या त्रयीचा मूलाधार धर्मच असून, धर्मास अविरुद्ध अशाच अर्थाची आणि कामाची प्राप्ति व विनियोग, अथवा, आयव्यय करण्यास शास्त्रानें सांगितलें आहे: व असें जो करील त्याचेंच जीवन आदर्श झालें असें समजावें! असो. आतां प्रस्तुत विषयाचा निरोप घेण्यापूर्वी, एक दोन महत्वाच्या गोष्टींचा थोडा जास्त खुलासा करावयाचा राहिला आहे, तेवढा करून मग मी पुढच्या प्रकरणाकडे वळणार आहें! त्यांपैकीं पहिली गोष्ट म्हणजे धर्माचरणाची! या गृहस्थाश्रमांत मुख्य धर्माचरण म्हणजे भक्ति व तीहि साधीसुधी, दगडामातीच्या मूर्तीची नसून, "भक्ती म्हणजे सर्वांभूतीं। सप्रेम भजनयुक्ति!" अशा थाटाची असावी, असें आम्ही मागें सांगितलें आहे. पण त्याजबरोबर ह्या द्वैती आणि त्रिविध प्रकृतींनीं भरलेल्या जगांत जोंवर आपणांस जगायचें

आणि रहायचें आहे, तोंवर दुष्टानासुद्धा देव मानून त्यापुढें दंडवत घालून आपला निभाव या जगात लागणार नाहीं! त्या कामीं तुकोबासारख्या शांतिनिधीचीहि शांति समाजहितदृष्ट्या पुरी पडली नाहीं, तिथें तुमचा आमचा काय पाड? आणि प्रथम अशा ठिकाणीं असल्या नसल्या शांतीची जरूरच कितपत आहे, हाहि प्रश्नच आहे! या कामीं—

> " विंचू देव्हाऱ्यासी आला। देवपूजा नावडे त्याला॥
> एथ पैजाराचे काम। अधमासीं तो अधम!॥ "—

तसेंच—

> " दया तिचें नाव भूतांचें पाळण। आणिक निर्दळण कंटकाचें!॥"

ही दयेची तुकोबानी दिलेली व्याख्या व ' धर्मनीतीच्या व्यवहारा 'चें सूक्ष्म रीतीनें ' निवडोनि' दिलेलें ' सार ' अत्यंत मार्गदर्शक होणारें आहे! अर्थात् चालू काळच्या मगरूर मुसलमानाच्या आणि गुंडवृत्तीच्या अत्याचाऱ्याच्या कहारात कोठल्याहि प्रकारे पुळचट राहून आपला निभाव लागणार नाहीं! आणि अशावेळीं, म्हणजे जेथें धर्मालाच खुद्द अडथळा होईल आणि स्वजीवितादिकाला धोका येईल, त्यावेळीं अशा अत्याचारी नरपशूंना खुद्द ब्राह्मणानींसुद्धा बेशक कंठस्नान घालावें, आणि तरीहि ते अपराधी ठरूं शकत नाहींत—त्यास यत्किंचितहि पाप लागत नाहीं, असाच उज्वल उपदेश आपणास आपल्या मनूनें केला आहे! तो म्हणतो:—

> " शस्त्रं द्विजातिभिर्ग्राह्यं धर्मो यत्रोपरुध्यते।
> द्विजातीनां च वर्णानां विप्लवे कालकारिते॥ ३४८॥
> आत्मनश्चपरित्राणे दक्षिणानाच संगरे।
> स्त्रीविप्राभ्युपपत्तौच घ्नन्धर्मेण न दुष्यति॥ ३४९॥
> गुरुं वा बालवृद्धौवा ब्राह्मणं वा बहुश्रुतम्।
> आततायिनमायान्तं हन्यादेवाविचारयन्॥ ३५०॥
> नाततायिवधे दोषो हन्तुर्भवति कश्चन।
> प्रकाशं वाऽप्रकाशंवा मन्युस्तं मन्युमृच्छति॥ ३५१॥"
>
> —( मनुस्मृति, अध्याय ८ वा )

बोला, वाचक ! यापेक्षां अजून उज्वल उपदेश तरी कोणचा हवा
पण असें असतांनाहि कोणी सरकारी कायद्याच्या नसत्या ससेमिऱ्याच
वास्तीनें, आणि यांत कांहीं 'बेकायदेशीर ' तर होणार नाहींना, ह्या नसत
वास्तीची हाय खाऊन, तर कोणी आजवरच्या परवशतेच्या पायीं जड
लेल्या पुळचटपणानें,

" आत्मान सततं रक्षेत दारैरपि धनैरपि ॥ "—

या शेळपट बुद्धीवादाचा आश्रय करून क्लीबाच्या करणीनें शेपू
घालून पळून जातात, ते मात्र अत्यंत निंद्य आणि गर्हणीय आहे ! त
असें करू नका ! कारण त्यामुळें उलट उन्मत्त पिशाचांचा नंगा ना
आणि " सहज मिलगया पाकिस्तान, लढके लेंगे हिंदुस्थान! " अ
हैदोस धुल्ला अधिकच वाढत जाऊन, " Survival of the fittest !
ह्या सृष्टीच्या अबाधित नियमान्वयें तुम्हास त्यापुढें नामशेष होऊ
जाण्याची वेळ लवकरच आल्यावाचून राहणार नाहीं, हें लक्षात ठेवा !
दुष्टांची रग भगवान् श्रीकृष्णांच्या पावलावर पाऊल ठेवून, प्रसंगीं शस्त्र
नेंहि जिरविण्यास मागेंपुढें पाहूं नका, हेंच माझें तुम्हांस सांगणें आहे
वास्तविक, ' शठंप्रति सत्य'चा प्रयोग राष्ट्रीयदृष्टया सफल होणें केव्हां
शक्य नव्हतें, व तसा तो झालाहि नाहीं ! उलट त्यामुळे आपल्या देशाची
देशबांधवांची, किती अपरिमित हानी झाली आहे, व अजूनहि हे स
म्हणावें तसें थांबलेलें नाहीं, हें उघड दिसत असतां, ' पडलो तरी माझें
नाक वर ! ' ह्या दुरभिमानानें दांभिक आचार्य लोकमान्यांच्या गीत
रहस्यांतील दिव्य प्रतिपादनास नसती नांवें ठेवण्याचा आव आणून
राष्ट्राचा घात करणाऱ्या अतिरेकी अहिंसेच्या तत्त्वाचा बडेजाव अद्यापि
मिरवूं पाहतात, ही केवढी दुर्दैवाची गोष्ट आहे बरें ? परंतु, असल्या खोट
प्रचारास आमच्या गृहस्थवाचकांनीं बळी न पडतां श्रीरामचंद्र, भगवा
श्रीकृष्ण, राणा प्रताप, श्रीशिवाजी महाराज, समर्थ रामदास व लोकमा

टिळक नि स्वातन्त्र्यवीर सावरकर इत्यादि थोर पुरुषाचें तत्त्वज्ञानच त्यानीं आत्मसात करावें, व त्याचा हुशारीनें प्रसंगानुसार उपयोग करण्यासहि कचरूं नये, यापेक्षा जास्त काय सागूं ? असो.

दुसरी गोष्ट, या पुरुषार्थत्रयींचे बाबतींत आजवर ज्याचें अज्ञान होतें त्यानीं यापुढें तरी त्याप्रमाणें वागण्यास सुरवात केली, तरीहि त्यांत त्यास फायदाच आढळून येणार आहे! इतकेंच नव्हे, तर त्याचें "स्वल्पाचरणहि मोठया भयापासून रक्षण करणारें आहे!" असेंच त्यास आढळून येईल. शिवाय " It is never too late to mend" ही इंग्रजी म्हण प्रसिद्धच आहे! तेव्हां ह्या सर्व बाबतींत—

" आतां तरी पुढें हाचि उपदेश । नका करूं नाश आयुष्याचा ॥ ! "
या तुकोबाच्या शब्दातच सर्वांची प्रार्थना करून हें प्रकरण पुरें करतों !



नक्षत्र ९ वें

## कौटुंबिक, सामाजिक व राष्ट्रीय कर्तव्यें !

" काय ? पुनः कर्तव्यें ? कर्तव्यें, कर्तव्यें ! ही कर्तव्याची पिरपिर संपणार तरी केव्हां बुवा तुमची आमच्या मागची ? " अशा तऱ्हेचा प्रश्न एखादा रंगेल गृहस्थ, आणि स्वकर्तव्याची जाणीव नसलेला इसम आम्हाला इथें—वरील प्रकरणाचें नांव वाचून—विचारण्याचा संभव आहे ! पण त्यास आम्ही तरी काय करणार ? आम्ही त्यास इतकेंच सांगूं कीं, बाबारे, खालील एका आंग्ल कवीच्या उद्गाराकडे पहा, म्हणजे आम्ही काय म्हणतों तें तुला समजेल ! तो म्हणतोः—

" I slept and dreamt that life was beauty ;
I woke & found that life was duty !"—

म्हणजे, " मी निजलों व मला स्वप्न पडलें कीं, आयुष्य म्हणजे चैनीचा फुलबाग आहे; पण मी जागृत होऊन पहातो तों मला असें आढळून आलें कीं, आयुष्य म्हणजे गुलाबपुष्पाची शय्या नसून, त्या खालच्या कठिण कटकांनींयुक्त–कर्तव्याच्या काट्यानीं भरलेली व तरवारीच्या धारेप्रमाणें अशी कठोर कर्तव्यपालनाची पुण्याई आहे!" ही मानवी पुण्याई महद्भाग्यानेंच प्राप्त होत असते. पण असें असतांहि आयुष्य म्हणजे ज्याना एक चैनीचा मेवा वाटतो व "खाना पीना, और मजा उडाना !" यापेक्षां पलीकडे ज्यांची आयुष्याची दृष्टीच जात नाहीं, त्या अभागी जीवांनीं हें पुस्तक न वांचलेलेंच एकपरी बरें ! कारण, " न चाशुश्रूषवे वाच्यं नच मां योऽभ्यसूयति । " असें हें शास्त्र आहे. प्रस्तुत पुस्तक म्हणजे एखादी कादंबरी नसून, तें गृहस्थाश्रमीयांच्या कर्तव्याचें शास्त्र आहे–कर्तव्यप्रतिपादक असा हा ग्रंथ आहे, हें प्रारंभींच लक्षांत ठेवलें पाहिजे ! आणि आपला प्रत्येक शब्द, प्रत्येक आचार, आणि प्रत्येक उच्चार हा विचार-

पूर्वकच व्हायला हवा, हें आपलें कर्तव्य नव्हे काय? मग याप्रमाणें "स्वकर्म-सूत्रग्रथितोहिलोकः" यांतील 'कर्म' शब्दाचा अर्थ 'कर्तव्य' असा घेऊन, कर्तव्याच्या सूत्रानीं सर्व जगत्रय बांधलेलें आहे, असें म्हणावयास काय हरकत आहे? आणि ही जर गोष्ट खरी, तर मग त्या कर्तव्याची एवढी 'पिरपिर' का बरें वाटावी! खऱ्या विचारी पुरुषांना ती वाटतहि नाहीं! आणि अशांच्यासाठींच हें पुस्तक आहे, उडत्या फुलपाखरांच्यासाठीं नाहीं, हें मी वर सांगितलेंच आहे! असो.

आतां प्रथम कौटुंबिक कर्तव्याचा विचार करूं! त्या कामीं प्रथम ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, प्रत्येक कुटुंबच नव्हे, तर त्यांतील प्रत्येक मनुष्य हा समाजाचा एक घटकावयव आहे! अर्थात् समाजाशीं प्रत्येक व्यक्ति व प्रत्येक कुटुंब हे कांहीं विशिष्ट कर्तव्याच्या नात्यांनीं बांधलेलें आहे, व "सोय जाणेल तो सोयरा" ह्या म्हणीप्रमाणें समाजाच्या कल्याणाची व उन्नतीची सोय जर ती व्यक्ति अगर कुटुंब जाणील, म्हणजेच त्या कुटुंबाचा नेता जो गृहस्थाश्रमाचा धनी—गृहस्थ—तो ती आळखील, तरच त्यास आपणांस समाजाचे घटकावयव असें म्हणण्याचा अधिकार पोचणार आहे! नाहीं-तर, 'कुऱ्हाडीचे दांडे अन् गोतास काळ' असे वागणारे इसम हे त्या समाजाचे गोत नसून, त्यास आपल्या करणीनें 'गोतांत' घालणारे कर्मनष्ट चांडाळ होत, यांत शंका नाहीं! जो समाजाचा व कुटुंबाचा संबंध सांगितला, तसाच कुटुंबाचा आणि राष्ट्राचा अथवा देशाचा आहे, आणि जे समाजाच्या बाबतींत उद्गार काढले, तेच राष्ट्राचेहि बाबतींत तितकेच लागू पडतात, हें लक्षांत ठेवलें पाहिजे! असो. तर प्रथम कुटुंबाच्या नेत्याचीं समाजाच्या दृष्टीनें व कुटुंब व समाज यांच्यामधील धाग्याच्या दृष्टीनें काय काय कर्तव्यें आहेत, तीं आपणास आतां पहावयाचीं आहेत. कारण, खुद्द कुटुंबासंबंधीं—म्हणजे त्यांतील मुख्य घटकावयव जीं त्याचीं नायकामुळें, त्यांच्यासंबंधीं त्याचें काय कर्तव्य होतें तें येथवर मीं सांगितलेंच आहे! तेव्हां आतां कुटुंब समाज-

सबंधाच दृष्टीनें प्रत्येक कुटुंबीयाचें काय कर्तव्य ठरतें, तिकडे आता आपण वळू या !

याप्रमाणें वळून पहता, आपली दृष्टि सहाजिकच अत्यंत महत्त्वाचा प्रश्न जो विवाह, त्याकडे जाते! आमच्या मतें तर हा प्रश्न नुसता महत्त्वाचा नसून तो सर्वंकष आहे !—म्हणजे इतर सर्व प्रश्न ह्या प्रश्नावरच अवलंबून असून, सूर्य मध्यें राहून ज्याप्रमाणें आपली सर्व ग्रहमाला आपल्याभोंवतीं भिंगरीसारखी फिरवीत असतो, त्याचप्रमाणें ह्या विवाहाच्या एका प्रश्नाभोंवतींच —(१) बालविवाह, (२) प्रौढ विवाह, (३) प्रेमविवाह, (४) विधवाविवाह, (५) पोटजातींचें एकीकरणात्मक विवाह, (६) मिश्रविवाह, (६ अ) भिन्नधर्मीय विवाह, (७) हुंडा, (८) मुलामुलींचें शिक्षण, (९) आजन्म ब्रह्मचर्य, (१०) गरीबश्रीमत विवाह, व (११) विवाहपद्धति अथवा प्रकार, इत्यादि कितीतरी प्रश्नाचे ग्रहोपग्रह सारखे घिरट्या घालून घोटाळत आहेत—गिरगिरत राहिले आहेत! अर्थात् त्याची व्यवस्थित सोडवणूक करणें म्हणजेच हा वैवाहिक प्रश्न यथासाग सोडविणें होय, हें उघड आहे! पण यावरून 'विवाह' म्हटला म्हणजे आपल्या समजातील शेकडों अज्ञानी लोकाना जी एक क्षुल्लक बाब वाटते, तशी ती नसून त्याचें किती महत्त्व आहे, तो प्रश्न किती गाढ आणि खोल आहे, हें आता सुज्ञाच्या लक्षात आलेंच असेल! पण ह्या प्रश्नाचा सागर कितीहि अगाध असला, तरी एखाद्या पटाईत पाणबुड्याप्रमाणे आपण त्यात धडाधड उड्या आणि बुड्या घेऊन, त्यासंबधीं विचारमौक्तिकें काय काय सापडतात, तें पाहूं या!

आतां प्रथमतः हें सांगणें अवश्य आहे कीं, वरील विवाहासंबंधींचे प्रश्न इतके मोठे व व्यापक आहेत कीं, त्या प्रत्येकावर एक एक स्वतंत्र ग्रंथ तज्ञाना लिहितां येईल! अर्थात् इतका व्यापक विचार आपणांस प्रस्तुत ग्रंथात करणें शक्य नाहीं, व तितकी माझी योग्यताहि नाहीं! तथापि,

माझ्या अल्पमतिप्रमाणें मी थोडेबहुत विवेचन खालीं करणार आहें! तसेंच उगाच जास्त विस्तार होऊन प्रस्तुत ग्रंथाची जागा अडूं नये, व पुन्हा पुन्हां तेंच तेंच सांगण्याचा प्रसंग पडूं नये, यासाठीं मला हेंहि येथें सांगितलें पाहिजे कीं, वरील बहुतेक प्रश्नाचा सविस्तर विचार मीं माझ्या 'कमला', 'लीला', 'यमुना' व 'मानवी हृदय' या कादंबऱ्यांतून व 'कविसंसार' नामक नाटकात आणि 'तरुणाचा तांडेल' या पुस्तकात केलेला आहे. तरी सुज्ञानी तीं पुस्तकें डोळ्याखालून घालावींत, म्हणजे खालील विवेचन समजण्यास त्यास अधिक बरें पडेल. तथापि, सर्व प्रश्नाबद्दल थोडक्यात का होईना, पण स्पष्टपणे मी माझें म्हणणें आता खालीं मांडतो!

पहिली गोष्ट मुलामुलींना शिक्षण देण्याची घेऊं! सोहिरोबानीं "अंतरिचा ज्ञानदिवा मालवूं नकोरे!।" असे उद्गार आपल्या एका प्रसिद्ध पद्यात काढले आहेत, त्यावरून ज्ञानाला दिव्याची उपमा देतात, ही गोष्ट प्रसिद्ध आहे, आणि ती उपमा अगदी सार्थ आहे व ऐहिक ज्ञानालाहि पण ती तितकीच लागूं पडते, हेंहि पण उघड आहे! आतां स्त्रीपुरुषाचा वैवाहिक संसार जर सुखाचा व्हावा अशी इच्छा असेल, तर त्याला 'ज्ञान' ही अमोलिक चीज त्यापैकीं प्रत्येकाजवळ असणें हें अगदीं जरूर आहे, हें कोणीहि कबूल करील; आणि यद्यपि हें ज्ञान पुस्तकातच सर्वस्वीं दडलेलें नसलें, तथापि, ज्ञानप्राप्तीचें तें एक मोठें साधन कसें आहे, व त्यावांचून बहुधा सामान्य मनुष्य अशिक्षित व अज्ञानीच कसा राहतो, आणि त्यामुळें त्याचा संसार त्याच्यासकट त्याच्या सर्व कुटुंबाला कसा दुःखदायक व हानिकारक होतो, हें अशा लोकांच्या संसारी जीवनाचें सूक्ष्मपणें अवलोकन करणारास तेव्हाच दिसून येईल! आता तशा त्या अज्ञानातच त्यांतील कित्येक बापडे जीव सुख मानतात, हा भाग निराळा; परंतु तें खरें सुख नसून 'मासेविक्या बायांच्या मासोळ्यांच्या पाट्यातील माशांच्या दुर्गंधीच्या सुगंधाचें (!)' तें सौख्य होय, हें कोणीहि विचारी जीव तेव्हांच कबूल करील! अर्थात् संसारसुखाला 'ज्ञान' हें अवश्य आहे, व ज्याव-

हारिक ज्ञान मिळविण्याचा कितीहि अन्य रीतीनें यत्न केला, तरी त्यांतच भर घालून, शिवाय सहृदयता, रसिकता, काव्यमयता, निसर्गाभिरुचि, व तत्वज्ञान इत्यादि गोष्टींचा हृदयंगम मिलाफ अंतःकरणात होऊन जीवनाला जी एक रसाळ व स्निग्ध गोडी यावयाची, व उदात्त गांभीर्य प्राप्त व्हावयाचें, तें केवळ रुक्ष व्यावहारिकांच्या जीवनांत आपणास क्वचितच पहावयास सांपडतें! याचें कारण श्रवणवाचनद्वारां त्यांची 'बहुश्रुतता' वाढलेली नसते हेंच होय! अर्थात् वरील परमोच्च व मंगल गुणांच्या गोष्टी प्राप्त व्हावयाच्या म्हणजे त्यांत पुस्तकी विद्येचाहि थोडाबहुत भाग आलाच, हें उघड आहे! 'पुस्तकी विद्ये'ची हेटाळणी आणि टवाळी ज्यांना करावयाची असेल ते खुशाल करोत—आणि ते ती ज्या दृष्टीनें करतात त्या दृष्टीनें ती बरोबरहि असते,--तथापि, अशी हेटाळणी करणारे बहुतेक आणि बहुधा अशिक्षित व असमंजस गावढेच असतात; व त्यांनीं आपल्या व्यावहारिक ज्ञानाचा कितीहि तोरा मिरविला, आणि तो थोडाबहुत खराहि असला, तरी वरील मंगल गुणाच्या अभावीं—ते गुण त्यांचे ठायीं नाहींत म्हणून—त्यांचीहि हेटाळणी व टवाळी सुशिक्षितांनाहि त्या बाबतींत करतां येणार नाहीं, असें नाहीं! थोडक्यात मुद्दा इतकाच कीं, व्यवहार आणि काव्य यांची गोड सांगड ज्या जीवाच्या जीवनांत पडेल, त्याचाच संसार सर्वतोपरी सुखद होईल! यासाठीं, अशा तऱ्हेच्या सुखद संसाराचीं फुलें जागोजाग फुलावीं व त्यानें सर्व समाजोद्यान फुलून जावें, अशा प्रकारचें हृदयरम्य दृश्य दृष्टीस पडण्यास 'ज्ञान' हें एक अमोलिक साधन आहे, यांत शंका नाहीं! व प्रत्येक गृहस्थानें तें—म्हणजेच ही ज्ञानसुधा—मनमुराद आपल्या लेकरांना पाजीत असावें, म्हणजे त्यापासून उत्तरोत्तर, अधिकाधिक, इष्ट इष्टतर फलाचीच प्राप्ति होत जाईल, हें निःसंशय समजावें! तथापि, व्यावहारिक दृष्ट्या विचार करून सांगावयाचें म्हणजे, समान हक्काच्या भांडणाचें भूत आपल्या आर्यभूमींत शिरून, तें विलायती पीक येथें पिकूं नये यासाठीं, आर्यसंस्कृतीच्या दृष्टीनें

मुलींना, त्याचा जर विवाह करणें असेल तर, सामान्यतः इंग्रजी सातवीच्या पुढें शिकवूं नये व तें शिक्षणहि कर्व्यांच्या 'महिलाश्रमा'सारख्या आश्रमांतून दिलें जावें, म्हणजे विद्येला विनयाची जोड मिळून त्याच्या संसाराच्या दुधांत साखरच पडणार आहे, असें आमचें मत आहे! शिवाय, स्टॅन्ले हॉलनें दाखविलेली विवाहवयातिक्रमण व वैवाहिक अक्षमता ही त्याचे ठायीं त्यामुळें येणार नाहीं! तथापि, इतकें शिक्षण द्यावयाचें म्हटलें, तरी त्याच्या सपाट्यातच बालविवाहाची अनिष्ट चाल नाहींशी होऊन जाऊन त्या ठिकाणीं प्रौढ विवाहाच्या योग्य चालीची प्रस्थापना होणार आहे, हें उघड आहे! पण आम्ही बालविवाहाचा निषेध करून प्रौढ-विवाहाची तरफदारी का करतो याला अन्यहि कारणें आहेत, व शंकितांच्या समाधानासाठीं त्याचाहि थोडक्यांत आम्ही खालीं निर्देष करतों; तरी तिकडे लक्ष द्यावें.

बालविवाह न करतां प्रौढविवाह करण्याच्या तीन कारणांपैकीं शिक्षणाची पूर्तता होणें हें एक कारण वर सांगितलेंच आहे. दुसरें कारण असें कीं, विवाह बालपणींच करून दिल्यास त्या व्यक्तीच्या आत्मिक उन्नतीच्या भरधांव गतीला आपण उगाच आणि आगाऊच प्रतिबंधक धोंड तयार करून ठेवून ती त्याच्या गळ्यात अडकवितों, असें होत नाहीं काय? कारण, अशा तऱ्हेच्या आत्मिक उन्नतिच्या मार्गावर भरधाव गतीनें जाणाऱ्या व्यक्ति लाखात, किंबहुना, कोटींत एक, इतक्या दुर्मिळ असल्या, तथापि, त्यांच्या प्रगतीस तरी अडथळा घालण्याचा आपणांस काय अधिकार आहे? असा अडथळा घातला गेल्यामुळेंच पुष्कळ मुमुक्षुमार्गीयांना—"जिवलग जिव घेती प्रेत सांडोनी देती। विषय सकळ नेती मागुता जन्म देती॥" अशा प्रकारचे उद्गार काढण्याचा प्रसंग आला आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे! तेव्हां याबाबतींत 'स्वयं निर्णया'चेच तत्व अमलात आलें पाहिजे, असें आमचें स्पष्ट मत आहे! आणि 'स्वयं निर्णय' करायचा म्हणजे त्याला प्रौढ वय आलेंच!

बाळविवाहाचा निषेध करून प्रौढ विवाहाचा पुरस्कार करण्याचें तिसरें कारण म्हणजे, ज्या दोन जीवांचा विवाह व्हावयाचा त्याचे विचार, आचार, उच्चार, भावना, कल्पना, आकांक्षा, संवयी, शिक्षण, शील इत्यादि गोष्टींत साम्य असल्यावाचून तो विवाह दोघांसहि दुःखदायक होतो, असाच आपला नेहमींचा अनुभव नाहीं काय? अर्थात् तसा अनुभव यावयास नको असेल, आणि वरील गोष्टींतील साम्य पारखावयास हवें असेल, तर ती गोष्ट बालविवाहानें कशी साध्य होणार? शिवाय, ज्या दोन जीवाची मैत्री जगांत होते, त्यांचीं मनें एकमेकास मिळावीं लागतात— आणि ती वरील गोष्टींतील साम्यानेंच बहुशः मिळू शकतात—असें आपण नेहमींच्या व्यवहारातहि पाहातोच; आणि त्यावरूनच 'Birds of the same feather flock together' अशी इंग्रजींत म्हण पडली आहे! मग भावी आयुष्यात जो जीव व्यासोक्तीप्रमाणे आपला 'श्रेष्ठतम सखा' व्हावयाचा त्याचीं आपलीं मने किती बरे मिळालीं पाहिजेत? व त्याची पारख करताना आपणास किती बरे खबरदारी घेतली पाहिजे? अर्थात् अशा तऱ्हेची मनाची मिळणी व पारख बालविवाहानें कशी साध्य होणार? या मनाच्या मिळणीलाच 'हृदयमीलन' अथवा 'प्रेम' अशा अन्य संज्ञा आहेत, आणि 'विवाहोत्तर प्रेम, का प्रेमोत्तर विवाह?' या नुकत्याच वादाची भरती येऊन गेलेल्या प्रश्नात आम्ही दुसऱ्याच बाजूचे आहोंत, हें वरील विवेचनावरून आणि आमच्या 'कमला, लीला'दि कादंबऱ्यावरून वाचकांना कळून येणारच आहे. कारण, विवाह म्हणजे दोन आत्म्याचे लग्न होय, ती पशुवृत्ती नव्हे, असें आमचें स्पष्ट मत आहे! दोन शरीरावरील पदराच्या गांठी एकत्र बांधल्या गेल्या, म्हणजे त्या शरीरांतील दोन आत्मेहि 'सलग्न' झाले असें निश्चयानें आपणास म्हणतां येईल काय? अर्थात् अशा स्थितींत अशा विधीला 'लग्न' किंवा 'विवाहमंगल' न म्हणतां 'लग्नाचा फार्स' ऊर्फ 'विघ्नमंगल' म्हणणेंच अधिक शोभणार आहे!

पण अशा प्रकारचे 'फार्स' आपल्या हिंदुस्थानांत घरोघर उडतांना प्रतिवर्षी आपणांस दृष्टीस पडतात ! म्हणूनच कविवर्य टिळक म्हणतात:—

" हौस पुरवावी खेळ करून घ्यावा । पुढें नशिबाला दोष सर्व द्यावा! ॥
भरतखंडीं हा अर्थ विवाहाचा । मनुष्याचा, न श्रुतींचा स्मृतींचा !॥ "

यासाठीं, असे 'फार्स' उडायला आणि अशा शोकपर्यवसायी नाटकाचे देखावे घरोघर दृष्टीस पडायला नको असतील, उलट कल्याणकर देखावेच दृष्टीस पडावेत अशी इच्छा असेल, तर—

" संतुष्टो भार्यया भर्ता भर्त्रा भार्या तथैवच ।
यस्मिन्नेव कुले नित्य कल्याण तत्र वै ध्रुवम् ॥"—

अशा प्रकारची स्थिति विवाहोत्तर दृष्टीस पडण्यास आपण एक काळजी अवश्य घेतली पाहिजे व ती म्हणजे हीच कीं, वधूवरांचें खरें 'हृदयमीलन' झाले आहे कीं नाहीं, मुलाला मुलगी व तितकाच मुलीला मुलगाहि पण पसत आहे का नाहीं, हे आपण मुख्य पाहिलें पाहिजे ! पण सध्या मोज काय दृष्टीस पडते बरें ? बिचारीं वधूवरें बाजूसच रहातात; आणि त्याच्या गोतवळ्यांचाच धागडधिंगा मात्र,- मुलगी अथवा मुलगा पाहण्यापासून तो लग्नाच्या अखेरपर्यंत,--सुरू असतो ! पण ज्यांचे विवाह आपण करणार, आणि ज्यांच्या नावावर आपण चार दिवस मिरविणार, त्यांच्या हौशी आणि त्यांच्या आवडीनावडी काय आहेत, ह्याचा एकजण तरी क्षणभर विचार करतो आहे काय ? मुलाला निदान मुलगी दाखवण्याचा व त्याची मामुली कबूली घेण्याचा तरी फार्स अलिकडे होतो. पण त्या पोरीच्या नशिबी तेवढेंहि सौख्य नाहीं—तिला तो अधिकारच नाहीं, अशी आमची नीच समजूत झालेली ! स्त्रीजातीला आपण किती बेशरमपणें वागवितो याचे हेंहि एक चित्र नव्हे काय ? अरेरे, पूर्वीची स्वयंवर पद्धती कोठें गेली ? हतभागी आर्यावर्ता, ह्या तुझ्या असल्या आपसांतल्या अत्यंत महत्वाच्या कृत्यांत मर्मी घाव घालण्याच्या कृतीनेंच तू परदास्यपंकांत

आजवर पिचत पडला होतास; व अजूनहि तुझे हाल चालूच आहेत, हें तुला कधीं समजणार? सद्गृहस्थहो, ही गोष्ट आपण कधीं उमगणार? आणि खऱ्या हृदयमीलनानें होणारें वैवाहिक सुखाचें स्वारस्य आपणाला कधीं कळणार?—" बाळा घालोनिया गळा। रक्तसुमनांच्या माळा। स्कंधावरि स्थापियला। लोहशूळ हा ॥ तैसे वत्सा नेति मला। कंठ माझा चिरायला। यज्ञकामि जसें पशुला। नेती ओढुनी॥॥"--ह्या चारुदत्ताच्या उद्गाराची या ठिकाणीं आम्हास आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं। अरेरे, आम्हीहि आमच्या वधूवरांना हारतुऱ्यानें आणि मोत्याच्या मुडावळीनें सजवून वैवाहिक यज्ञाच्या स्थंडिलावर त्यांची आहुती देण्यास—यांना चिरकाल दुःखात लोटण्यासच—त्या पशूप्रमाणे नेत नाहीं काय? ताशावाजंत्र्याच्या कडकडाटात हंसत मुखानें शेवटचा जोराचा तंडुलकणवर्षाव करीत असता, त्याचवेळीं तितक्याच जोराची मूकरुदनाची वृष्टि वधूच्या अगर वराच्या, अगर उभयताच्याहि हृदयात चाललेली किती सहृदय सज्जनाना दिसत असेल बरें? पण खुद्द त्या वधूवराचे सगेसोयरे, आणि आप्तेष्टच जेथें पाषाण बनले, तेथें बिचारे इतर लोक काय! 'मिष्टान्नमितरेजनाः' याच वर्गातले ते बोलून चालून असतात! पण त्याच्यापुढें आपल्या ह्या निर्दय कर्माचा देखावा 'एक मंगल प्रसंग' म्हणून दाखवताना वधूवरपित्याच्या चित्तास शरम वाटायला नको काय? पण हा देखावा आणि हा प्रघात आमच्या इतका अंगवळणीं पडला आहे, तो आमच्या इतका सरावाचा झाला आहे कीं, तो आमच्या रक्तमासात भिनल्याप्रमाणें त्याचें आम्हास कांहींच सुखदुःख वाटेनासें झालें आहे! हरहर! कोण ही आमची स्थिति! आणि केवढा हा आमचा अधःपात! असो. पण असें व्हायला नको असेल, ही सर्व अनर्थपरंपरा टळायला हवी असेल, तर वधूवराचें—दोघाचेंहि—एकमेकाशीं खरें 'हृदयमीलन' झालें आहे कीं नाहीं हें आपण प्रथम पाहिलें पाहिजे, आणि मगच इतर विचारास लागलें पाहिजे! पण असें पाहायचें म्हणजे अर्थात् वधूवराचें प्रौढवय व प्रौढविवाह हा त्याच्या पाठोपाठ आलाच! असो.

या प्रौढ विवाहाच्या प्रश्नातच हुंड्याच्या प्रश्नाचाहि आपणास विचार केला पाहिजे! कारण, ज्याच्याबद्दल म्हणून आपण हुंडा घेतों त्याचें ह्या बाबतींत काहींच मत न घेणें आणि त्यास न विचारतां न खवरतां परस्पर पोरीच्या बापापासून वाटेल तसा अव्वाच्या सव्वा हुंडा उकळणें, हें कितपत न्याय्य आणि बरोबर आहे बरें? शिवाय या चालीला तुकारामा-सारख्या साधूचीच नव्हे, तर मोरोपंतासारख्या सच्छील कवीचीहि पण संमति नव्हती, हे मी माझ्या 'कविससार' नावाच्या नाटकांत विशद-रीतीनें दाखवून दिलेच आहे! बगाल्यातील 'स्नेहलता' नामक कुमारिकेनें याच हुंड्याच्या पायीं स्वतःस जिवत जाळून घेतलें, ही हकिगत वाचूनहि पाषाणहृदयी बनलेल्या आमच्या समाजावर काहींच परिणाम होत नाहीं, हें आश्चर्य नव्हे काय? पण यात आश्चर्य तरी कशाचें? हरामाचा पैसा उकळण्याचा लोभ ही चीजच जगात अशी काहीं और आहे कीं, तिच्या-पायीं मनुष्य काय काय अनन्वित कृत्यें करील, याचा नेम सागता येणार नाहीं! परतु 'पापवृक्षाचें मूळ' अशा ह्या नसत्या 'लोभा'ला बळी पडा-यचें कीं काय, याचा प्रत्येक धार्मिक विचारी गृहस्थानें विचार करावयास नको काय? आपल्या पोराचें लग्न करावयाचें म्हणजे स्वतःच्या मनाला वाटेल तशी पोळी पिकवून घ्यावयाची, मग आपल्या पोराचें व सामाजिक हिताचें काहीं का होईना, अशी दृष्टि ठेवणाऱ्या संकुचित वृत्तीच्या लोकाना " राष्ट्र, समाज आणि आत्मा, याविषयींचीं काहीं ऋणें आपणा-वर आहेत, व तीं सव्याज फेडल्यावाचून आपली अधोगति टाळता येणार नाहीं " या गोष्टीचा अजिबात विसर पडलेला असतो! परंतु असा विसर पडून आणि अशी संकुचित दृष्टि ठेवून आपला अधःपात कसा टळणार? व आपण उन्नतीच्या मार्गास लागून आपलें कर्तव्य बजावलें असें कसें होणार? यासाठीं या कामीं आपण वेळींच सावध व्हावयास नको काय? अर्थात् असें सावध व्हावयाचें म्हणजे मग बालविवाह करून कसें चालेल? शिवाय बालविवाहानें वाईट प्रजा निर्माण होते, हा मुद्दाहि

या बालविवाहाविरुद्ध आहेच. श्री. चिं. वि. वैद्यांनीं तर ' अवलोन्नति लेखमाले'त मराठ्याच्या पानिपतावरील पराभवाच्या कारणपरंपरेत मराठा प्रजा बालविवाहाची खुजी व दुर्बळ संतति असून, तिचा प्रौढविवाहोद्भूत अशा उंच, धिप्पाड व सशक्त पठाणापुढें साहजिकच टिकाव लागला नाहीं असेंहि या बालविवाहनिषेधार्थ उदाहरण दिलें आहे, तेंहि ' चित्य ' आहे असे कोण म्हणणार नाहीं ? ह्या बालविवाहामुळे बालविधवाची संख्याहि साहजिकच दृष्टीस पडते व ती प्रौढ विधवापेक्षा अधिक अनुकंपनीय असते; कारण, बिचाऱ्या त्या बालविधवेच्या बाळपणीच्या खेळांतच तिच्या जिवाचा ' खेळगडी ' हरपलेला असतो, विषयसुखाची गोडी चाखणे तर राहोच, पण त्याचें दर्शनहि बिचारीला व्हायच्या आधींच तिच्या जिवाचा जिवलग निघून गेलेला असतो ! अरेरे, किती हे शोचनीय आणि अनुकंपनीय दृश्य ! प्रौढ विवाहानें त्याची तीव्रता पुष्कळशी कमी होणार आहे, यांत शंका नाहीं !

पण हा प्रौढविवाहाचा प्रश्नहि 'सारडा'कायद्यानें कसाबसा सोडविण्याचा प्रसंग यावा,ह्यावरूनच आमची कुटुंब–समाज–संबधदृष्टि किती उथळ आहे, हेंच दिसत नाहीं काय?असो. त्यापुढचा विधवाविवाहाचा प्रश्न!अर्थात् प्रौढविवाहानें ह्या प्रश्नाची तीव्रता पुष्कळशी कमी होते हे आतांच सांगितलें.पण त्या बाबतींत आमचे थोडक्यांत असे मत आहे कीं, पुरुषांना जोंवर वाटेल तितक्या विवाहांचा परवाना आहे, तोंवर स्त्रियांनाहि तो तितकाच असला पाहिजे! कारण, जें विषयसेवनाच्या अतृप्तीचें कारण पुरुषाच्या बाबतींत लागू आहे, तेंच स्त्रियांच्याहि बाबतींत तितकेंच लागू नाहीं काय ? मग हा पक्षपात, अन्याय व जुलूम काय म्हणून ? आमच्या मतें ह्या बाबतींत दुसऱ्यांनीं ढवळाढवळ न करतां, ही बाब ज्याच्या त्याच्या मर्जीवर सोंपविली पाहिजे !--अर्थात् त्या कामीं उच्च, उदात्त व आदर्श चित्राचा उपदेश करू नये असें कोण म्हणेल ? पण तो दोघांनाहि सारखाच केला पाहिजे! व भावना जोंवर सारख्या आहेत तोंवर कायदेहि पण सारखेच पाहिजेत,

त्या कामीं निसर्गनियमांत नसती ढवळाढवळ करून अरेरावी वाक्य चालविण्याचा कोणासच अधिकार नाहीं, हें प्रत्येकानें लक्षात ठेवावें! आणि कायदे करायचेच झाले, तर ते न्यायाचे व समतेचे हवेत, त्याचा धारवाडी कांटा कोणत्याहि एका दिशेला झुकता असता कामा नये, तरच ते कायदे या नावाला पात्र होतील! अर्थात् जी गोष्ट कायद्यास, तीच त्याच्या अंमलबजावणीसहि तितकीच लागू आहे, हें वेगळें सांगणें नकोच, पण विधवाविवाहहि शेवटीं कायद्यानेंच सम्मत करून घ्यावा लागला, यावरूनहि आमची स्वार्थी दृष्टि त्याकामी किती विकृत होती, हेंच आपण तावत्कालपर्यंत दाखविलें नाहीं काय? असो.

आता प्रश्न राहिले सहा. ते असे—( १ ) गरीब-श्रीमंतविवाह ( २ ) पोटजातींचे विवाह, ( ३ ) मिश्र विवाह, ( ४ ) भिन्नधर्मीय विवाह, ( ५ ) विवाहपद्धति व ( ६ ) आजन्म ब्रह्मचर्य. त्याचा आता थोडक्यात व क्रमाक्रमाने विचार करू!

पहिला प्रश्न, गरीब श्रीमतविवाहाचा! आपल्याकडे 'मुलगी करावी गरीबाची आणि द्यावी श्रीमताला' अशी एक म्हण आहे. त्यातील पहिल्या अर्थांशीं आमचें एकमत असून, दुसऱ्या अर्धाच्या बाबतींत मात्र आम्हास एवढेंच म्हणावयाचे आहे कीं, मुलगी द्यावयाची तीहि पण गरीबालाच द्यावी! म्हणजे, गरीबाची मुलगी करायची आणि गरीबालाच मुलगी द्यायची, अशा रीतीनें समाजांतील श्रीमतानीं, किंबहुना, समाजातील प्रत्येक थरानीं, द्रव्यदृष्टया आपले खालचे थराचे बाबतींत याप्रमाणें वर्तन केल्यास, "एकमेका साहाय्य करू । अवघे होऊ सुखवत ॥" याप्रमाणें समग्र-समाज सुखी करण्याचें श्रेय सर्व सुशिक्षित श्रीमतानाच नव्हे, तर समाजांतील प्रत्येक थराला कोणत्याना कोणत्या रूपानें लाभणार आहे! विवाहसंस्था ही भाडण्यासाठीं नाहीं, चैनीसाठीं नाहीं, द्वेषासाठीं नाहीं, उपटेगिरी

करण्यासाठीं नाहीं, नडवणुकीसाठीं आणि अडवणुकीसाठींहि नाहीं, तर एकमेकांच्या जीवाचे सखे म्हणजेच 'सगे', आणि एकमेकाची सोय पाहाणारे 'सोयरे', आणि एकमेकांच्या दुःखानें धायधाय रडणारे 'धायरे' समाजात उत्पन्न व्हावेत, यासाठीं ही संस्था आहे! आणि असें व्हावयाचें, अशा-रीतीनें एक कुटुंब दुसऱ्या कुटुंबाशीं संलग्न व्हावयाचें, म्हणजे वरील प्रकारचीच विवाहसंस्था अमलात आली पाहिजे, हें उघड आहे! शिवाय अशी व्यवस्था अमलात येण्यानें मागें उल्लेखिलेल्या श्रीमत धनिकांच्या सामाजिक कर्तव्यपालनासहि त्यानें हातभार लागणार आहे! तरुणतरु-णींच्या प्रेमविवाहातील प्रेमविचारासहि वरील प्रकारचें गोड वळण लागून, "पीडित जन देखता, स्वसुखा त्यागी दया" आणि "खरा तो प्रेमा ना धरी लोभ मनीं" अशा प्रकारचे उद्गार श्रीमत तरुणतरुणींच्या तोंडून ज्या दिवशीं निघतील, व गरीबींतील "गुणरसपान हेचि सुख, प्रेम तया नांव जनीं" अशी भावना ज्या दिवसापासून त्यांची होईल, तो दिवस सामाजिक इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखा झळकत राहील, यात शंका नाहीं! यासाठीं प्रत्येक पालकांनीं-म्हणजेच प्रत्येक गृहस्थांनीं-आपल्या मुलामुलींच्या विचारास लहानपणापासूनच अशा-प्रकारचें वळण व शिक्षण देण्याचा प्रयत्न करणें इष्ट नाहीं काय? कारण, प्रेमाची गोष्ट पुष्कळशी पाण्यासारखी आहे! त्या पाण्याच्या प्रवाहाला जसें वळण द्यावें तसा तो वहात जातो, ज्या रंगात त्या पाण्याला मिसळावें, त्या रंगाचें रूप तें धारण करतें, आणि ज्या कडू अथवा गोड--म्हणजेच लिंबाच्या अगर आंब्याच्या--झाडास तें घालावें, त्याप्रमाणें त्याचीं फळें प्राप्त होतात, तीच गोष्ट या प्रेमजलाचे बाबतींतहि लागू आहे! यासाठीं त्या कामीं शक्यतों चांगल्या तऱ्हेचा प्रयत्न करणें, हें आपलें कर्तव्य आहे!

दुसरा प्रश्न, पोटजातींतील विवाह! मिरजेच्या दिवेकर शास्त्र्यांनीं "ब्राह्मण जातींतील पोटजातींचें एकीकरण" या

विषयावर मागेंच केसरी पत्रातून लेखमाला देऊन व हल्लीं ती पुस्तक-रूपानेंहि प्रसिद्ध करून ब्राह्मणामध्यें किती कल्पनातीत पोटजाती आहेत, त्या बहुतेक कशा चागल्या आहेत, परंतु, केवळ निष्कारण गैरसमज आणि हेवेदावे यामुळें त्या समाजातील अल्पसंख्य अशा कितीतरी पोट-जातींतील कुमारिकाची या विवाहाचे बाबतींत कशी कुचबणा होत आहे, याचें मोठ्या हृदयस्पर्शी वाणींत चित्र रेखाटलें आहे! त्याच्या लेखमाले-संबधीं त्यानंतर कांहींजणानीं पत्र लिहून त्यासंबधीं उत्तर प्रत्युत्तरेंहि झालीं, व श्री. दिवेकर शास्त्र्यानीं त्याचीं वेळोवेळीं उत्तरें देऊन, आपल्या लेखमाले-तील शेवटच्या लेखात संपूर्ण खुलासाहि केला आहे! आणि त्यावरून आमचें असें ठाम मत झाले आहे कीं, हे पोटजातीचे विवाह होणें ब्राह्मण-समाजाच्या हिताच्या दृष्टीनें अत्यंत अवश्य आहे! जी गोष्ट ब्राह्मण समाजाची, तीच गोष्ट क्षत्रिय, वैश्य, शूद्रादि इतर समाजाचीहि असून, जेथें केवळ ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, आणि शूद्र अशा चार संघटित, बलिष्ठ आणि सामर्थ्यवान् अशा जाती असावयाच्या, तेथें अठरा पगडच नव्हेत, तर त्या चाराच्या चारशे आणि चार हजार जाती आपल्या हिंदु समाजात वावरत आहेत, आणि 'अक्करमासे आणि बारामासे' असे करकनरीच्या वंशाचे अक्काबाईचे खेळ खेळत आणि एकमेकाचा हेवादावा करीत आहेत, व अशा रीतीनें समग्र समाज खिळखिळा करून टाकून आम्ही त्या समाजाला सामर्थ्य-हीन, तेजोहीन, आणि एकमेकांबद्दल सहानुभूतिशून्य असा करून सोडला आहे, उंबरातल्या किड्याप्रमाणे जो तो आपल्या वर्तुळातच घिरट्या घालतो आहे आणि दुसऱ्याचें कांहीं का होईना, 'मला काय त्याचें!' असें म्हणून बेगुमान वृत्तीनें वागत आहे! साहजीकच मग परकीयानीं आमच्यावर वाटेल तसे हल्ले चढवून सांपडतील तेथे आमचे लचके तोडा-वेत, यात काय आश्चर्य! यासाठीं समग्र हिंदुसमाजानें जागृत होऊन चार हजार जातींच्या जागीं सुदृढ व सुसंघटित अशा चार जातीच कशा

राहतील याच्या विचारास लागण्याची आजकाल गरज आली नाहीं काय ? देशाच्या आयुष्याचा प्रत्येक दिवस आपणास हेंच सत्य पटवून देत नाहीं काय ? यासाठीं " उठा, जागे व्हा, व एकदां डोळे उघडून ही भीषण परिस्थिति पाहून त्यावर तावडतोब वरील उपायाच्या अमलबजावणीस लागा ! " एवढेंच आमचें सर्व समाजांतील सद्गृहस्थाना त्या कामीं पुन:पुन्हा हात जोडून सांगणे आहे !

यानंतरचा प्रश्न मिश्रविवाहाचा, म्हणजेच हिंदु समाजातील आत्ताच सांगितलेल्या ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र या चार जातींचा एकमेकाशीं बेटीव्यवहाराचा होय ! यासबंधीं आमचें ठाम मत असे आहे कीं, अशा प्रकारच्या विवाहाचा सब्गोलंकार होणे केव्हांहि इष्ट नाही ! या कामीं कै. भालाकार भोपटकर याच्या म्हणण्याप्रमाणेंच आम्हीहि म्हणतो कीं, जातीजातींतील सलोख्याचा प्रश्न केवळ भेटीव्यवहारापुरताच थांबवावा, त्याला रोटीची जरूर मुळींच नाहीं, आणि बेटीची तर नाहींच नाहीं ! २२ वर्षांपूर्वी 'सवाई कॉलेज'च्या १६-१-२८ च्या अंकांत आम्ही जें म्हटलें होते तें आजहि खरे आहे कीं, " एकत्र भोजनाचे रोज पुख्खे उठवले म्हणजेच एकी होते, इतकी जर एकी सोपी असती, तर एकमेकांच्या ताटांत जेवणारीं पाश्चात्य राष्ट्रें वेळ येतांच एकमेकांच्या नरडीचा घोट घेण्यास कां धावलीं असतीं ? अर्थात्, रोटी आणि लोटी एक झाली म्हणजे एकी झाली ही समजूत साफ खोटी—केवळ भ्रामक आहे, हेंच यावरून उघड होत नाहीं काय ? खरी एकी ताटवाटींत नसून अंत:करणाच्या भावनेंत आहे ! एकाच विचारानें व ध्येयानें स्फुरणाऱ्या दोन हृदयांची एकी होऊ शकते, व तीच खरी एकी होय ! बाकीची एकी ही भोजनभाऊची एकी असून, केवळ चालत्या काळची 'मजा उडाना' अशी आहे ! 'तुम्ही आम्ही एक, अन् कण्टाळीला मेख !'—असाच प्रकार त्यांत बहुशः असतो ! अर्थात् राष्ट्रावरील आपत्तीच्या प्रसगीं, अन्य कुटकाच नसेल, तिथें राष्ट्रदेवीच्या चरणीं सर्व भेदाभेद समर्पिणे वेगळें, व तसें कारण नसतां, केवळ सब गोलकाराच

उदोउदो करून रोज एक एक पायरी घसरणें वेगळें !" अर्थात् ही जर रोटीच्या व्यवहाराची स्थिति, तर बेटीव्यवहाराच्या स्थितीबद्दल तर काय बोलावयासच नको ! "वर्णसंकरानें जातिधर्मांचा आणि कुलधर्मांचा नाश होऊन शेवटीं नरकाचा निवास सर्व राष्ट्राला पत्करावा लागतो" अशा तऱ्हेचा निवाडा खुद्द अर्जुनानें भगवत्गीतेच्या पहिल्या अध्यायांत सांगितला आहे, हें विसरून चालणार नाहीं ! शिवाय, इतिहासावरून जर कांहीं शहाणपणा शिकावयाचा असेल, तर अशा प्रकारची मिश्रविवाहाची पद्धति "अनुलोम–प्रतिलोमविवाह" ह्या नावाखालीं एकेकाळीं चालू होती, परतु तिचें अनर्थकारक परिणाम दिसून आल्यामुळेंच ती बंद करावी लागली, असें आपणास इतिहासावरून दिसून येते ! सदर लग्नाची आणि त्यापासून उत्पन्न होणाऱ्या मुलाची वर्णनें व इतिहास आपणास मनुस्मृतींत मनमुराद पहावयास सापडतोच आहे ! मग इतिहासावरून मानवानीं शहाणपण शिकावयास नको काय ? पण असें असतांहि कांहीं अहंमन्य पंडित त्याकडे कानाडोळा करून या मिश्रविवाहाची आवश्यकता प्रतिपादीत असतात!-- पण त्या कामीं आमचें काय मत आहे तें आम्ही वर दिलेंच आहे !

तथापि, ज्याचें समाधान शास्त्रज्ञांच्या सांगण्यावाचून होत नसतें त्यानाहि आम्ही "पुरुषार्थ" मासिकाच्या फेब्रुवारी १९५०च्या अंकामध्यें याबद्दल आलेल्या लेखाचा हवाला देऊ इच्छितो. "तस्मात् शास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ" ह्या भगवदुक्तिप्रमाणें आपल्या जुन्या शास्त्रज्ञांनीं प्रत्यक्ष प्रयोगीकरणानीं निषिद्ध ठरविलेल्या वर्णसंकरजन्यप्रजेसंबंधीं वर सांगितलेंच आहे ! परंतु ज्याचें समाधान पाश्चात्य शास्त्रज्ञांच्या वचनांशिवाय होणार नाहीं, त्यांच्यासाठींहि आम्ही "पुरुषार्थ" मासिकाच्या अंकाचा उल्लेख वर केलाच आहे. पुणें ब्राह्मणसभेच्या 'अनिष्ट विवाह समिती'चा अहवाल 'काळ' पत्रामध्यें आलेला असून त्याच्या संपादकांनीं त्या आधारें आपले विचार मांडले आहेत. सन १९४७ मध्यें या 'समि-

ती’नें मागविलेल्या मतांत बहुमतांनीं असल्या विवाहाचा निषेधच केला आहे. परतु तो करतांना कित्येकांनीं पाश्चात्य शास्त्रज्ञांच्या वचनांचे आधार दिले आहेत, व तेच आधार, पाश्चात्यांच्या ओंजळीनें पाणी पिण्याची संवय अद्याप ज्यांची गेली नसेल, त्याच्यासाठीं आम्ही खालीं देत आहोंत, ते आमच्या गृहस्थवाचकांनीं वाचून अशा अनिष्ट प्रथेस आळा घालण्याचा शक्य तितका यत्न करावा, हेंच आमचें त्याना येथें सांगणें आहे! ऐका तर आतां पाश्चात्य शास्त्रज्ञाचें म्हणणें:—

( १ ) “ वर्णसंकरानें सर्व जुन्या संस्कृति नष्ट झाल्या ! ”

—प्रो. रग्गलगेट्कृत “हेरिडिटि अँड् युजेनिक्स् ”

( २ ) “ विषमसंकृतीचे संबंध नकोत. समसंस्कृतीनें उत्तम जाति उत्पन्न करा ! ”

—लिओनार्ड डॉर्विन्कृत–“नीड् फॉर् युजेनिक रिफॉर्म् ”

( ३ ) “ समाजाचें शास्त्रीयदृष्ट्या विभक्तिकरण व प्रत्येकाची त्यास अनुरूप अशी संस्कृति असणे अत्यन जरूर आहे ! ”

—ब्रट्रॉंड् रसेलकृत “ सायंटिफिक् औटलुक् ”

वरील पाश्चात्य शास्त्रज्ञांच्या वचनावरून तरी आमच्या समाजाचे डोळे उघडतील अशी आम्हांस आशा आहे. असो.

आतां यापुढचा प्रश्न भिन्न धर्मीय विवाहाचा होय ! वास्तविक हा प्रश्न निघण्याचें कारण नव्हतें. तथापि शीलवतीबाई केतकर, खानमालिनी, असफगांगुली, अरुणाअसफअली आणि सौ. शर्मिष्ठादेवी होळकर, इत्यादि विवाहांमुळे प्रस्तुत प्रश्न आज हातीं घेणें भाग पडत आहे. आणि त्यासंबंधीं आमचें मत असें आहे कीं, एक तर असे भिन्नधर्मीय विवाह मुळांत होऊंच नयेत; आणि त्यांतूनहि करणें झाल्यास, हिंदुधर्माच्या बाहेर असणाऱ्या भावी वरानें अथवा वधूनें हिंदु धर्माचा स्वीकार करून किंवा केल्यानंतरच तो व्हावा, हेंच इष्ट होय! कारण जगांत कोणता एकच एक धर्म सर्वश्रेष्ठ असेल, किंबहुना, सर्वव्यापी असेल,तर तो

एक हिंदुधर्मच होय, हें जगद्गुरु श्रीशंकराचार्य (डॉ. कुर्तकोटी) यांच्या शर्मिष्ठादेवीच्या (पूर्वीच्या मिस् मिलर्च्या) हिंदुकरणाच्या वेळेस श्रीक्षेत्र नाशिक येथें गोदातटाकीं झालेल्या महन्मंगल व परम उज्ज्वल व्याख्यानावरून कोणासहि दिसून येणार आहे! प्रत्येक वाचकानें व सद्-गृहस्थानें तें व्याख्यान वाचलें नसल्यास अवश्य व पुनःपुन्हां वाचावे, म्हणजे आम्ही काय म्हणतो त्याची त्यास सत्यता पटेल! अर्थात् अशा स्थितीमध्यें त्यातल्या त्यांत पाहिल्यास शीलवतीबाई केतकर व शर्मिष्ठादेवी होळकर यांचीं शुद्धिकरणे आणि हिंदुकरणें होऊन त्यांचे जे विवाह झाले, तेच चांगले होत, यांत शंका नाहीं! पण त्याच्याच उलट, खान मालिनी, असफ गांगुली, आणि अरुणा असफअली यांचे विवाह हे जितके तिर-स्करणीय, तितकेच चीड आणणारे आहेत, यात शंका नाहीं! स्वदेश, स्वधर्म, स्वसमाज, स्वसंस्कृति आणि स्वाभिमान नि स्वकुलाभिमान या सर्वांवर बोळा फिरवून प्रेमाच्या नांवाखालीं पशुवृत्तीचा अत्यंत हिडिस असा नंगा नाच घालणाऱ्या, आणि ज्यांनीं त्यांच्या हिंदुधर्मावर आणि त्यांतील पोरींबाळींवर वाटेल तसे अत्याचार केले, देवमंदिरांचा विध्वंस केला, आणि महनीय महात्म्यांचे खून केले, त्या महंमदीय शत्रूच्या जात-भाईंच्या गळ्यांतच उलट मोठ्या प्रेमानें मिठ्या मारणाऱ्या व त्या रूपानें आपल्या धर्माला व देशाला शत्रु उत्पन्न करणाऱ्या या मुलींना काय म्हणावें, तेंच आम्हांस समजत नाहीं! पण, हजारों देशभक्तात ज्याप्रमाणें एखादा दुसरा देशद्रोही पिसाळ—असूं नये, पण—असायचाच, त्याच-प्रमाणें असल्या ह्या अवलादी आपल्या धर्माला कलंक लावण्यासाठीं आणि हिंदुधर्मसूर्यावर थुंकण्यासाठीं मधून मधून क्वचित् काळीं जन्माला याव-याच्याच! परंतु त्यांनीं हें खूप लक्षांत ठेवावें कीं, "माध्यान्हीं थुंकितां सूर्यावरी। तो थुंका पडे आपणावरी॥" ही समर्थोक्तीच सदैव खरी होणारी आहे! इतर मुलींच्या पालकांनी मात्र त्यापासून योग्य तो बोध घ्यावा, एवढीच आमची त्यांस या कामीं विनंति आहे!

आता ह्या वैवाहिक प्रश्नासंबंधीं दोनच मुद्दे शिल्लक राहिले; त्यांतला पहिला म्हणजे 'विवाहपद्धति' अथवा विवाहाचे प्रकार, हा होय. त्यासंबंधीं सांगायचें इतकेंच कीं, ब्राह्म, गांधर्वादि एकंदर विवाहाचे अष्ट प्रकार मनूनें खालीलप्रमाणें दिले आहेत. ते मोठे वाचनीय असल्यामुळें येथें देत आहों:—

" ब्राह्मोदैवस्तथैवार्षः प्राजापत्यस्तथासुरः ।
गांधर्वो राक्षसश्चैव पैशाचश्चाष्टमोधमः ॥ २१ ॥ "

—( मनुस्मृति, अध्याय ३ )

याप्रमाणें एकंदर विवाहाच्या प्रकारांचीं नावें देऊन त्यांपैकीं प्रत्येकाचें नावनिशीवार वर्णन मनूनें खालीलप्रमाणें केलें आहे:—

" आच्छाद्यचार्चयित्वा च श्रुतिशीलवते स्वयम् ।
आहूय दानं कन्याया ब्राह्मो धर्मः प्रकीर्तितः ॥ २७ ॥
यज्ञे तु वितते सम्यगृत्विजे कर्मकुर्वते ।
अलंकृत्य सुतादानं दैवं धर्मं प्रचक्षते ॥ २८ ॥
एकं गोमिथुनं द्वे वा वरादादाय धर्मतः ।
कन्याप्रदानं विधिवदार्षो धर्मः स उच्यते ॥ २९ ॥
सहोभौ चरतां धर्ममिति वाचानुभाष्य च ।
कन्याप्रदानमभ्यर्च्य प्राजापत्यो विधिः स्मृतः ॥ ३० ॥
ज्ञातिभ्यो द्रविणं दत्त्वा कन्यायै चैव शक्तितः ।
कन्याप्रदानं स्वाच्छन्द्यादासुरो धर्म उच्यते ॥ ३१ ॥
इच्छयान्योन्यसंयोगः कन्यायाश्च वरस्य च ।
गान्धर्वः स तु विज्ञेयो मैथुन्यः कामसंभवः ॥ ३२ ॥
हत्वा छित्त्वा च भित्त्वा च क्रोशन्तीं रुदतीं गृहात् ।
प्रसह्यकन्याहरणं राक्षसो विधिरुच्यते ॥ ३३ ॥
सुप्तां मत्तां प्रमत्तां वा रहो यत्रोपगच्छति ।
स पापिष्ठो विवाहानां पैशाचश्चाष्टमोधमः ॥ ३४ ॥

—( मनुस्मृति, अध्याय ३ )

सद्गृहस्थहो, वरीलप्रमाणें महात्म्या मनूनें विवाहाच्या अष्ट प्रकारांचें व त्यांच्या उत्तममध्यमाधमत्वाचें वर्णन केलें असून, त्याच्या आसपासचे श्लोक पाहिल्यास आपणांस एक मोठी अद्भुत गोष्ट वाचावयास व ऐकावयास सापडते, व ती हीच कीं, 'आसुर' नामक जो विवाह आहे, त्या विवाहामध्यें कन्येच्या वडिलादिकास द्रव्य देऊन त्या मुलीला खरेदी करण्याची, गुलामाप्रमाणें विकत घेण्याची, प्रवृत्ति उघड उघड दिसत असल्यामुळें त्या विवाहाचा निषेध मनूनें मोठ्या कडक शब्दानें केला आहे ! तो म्हणतोः—

" न कन्यायाः पिता विद्वान्गृह्णीयाच्छुल्कमण्वपि ।
गृह्णंश्छुल्कं हि लोभेन स्यान्नरो ऽ पत्यविक्रयी ॥ ५१ ॥
स्त्रीधनानि तु ये मोहादुपजीवन्ति बान्धवाः ।
नारीयानानि वस्त्रं वा ते पापा यान्त्यधोगतिम् !– ॥ ५२ ॥ "

आणि याचाच अनुवाद तुकोबांनीं—

" कन्येचा जे नर करिती विकरा । ते जाती अघोरा नरकपाता !–॥ "

या आपल्या प्रसिद्ध वचनात केलेला आहे. तरुण कुमारिकांच्या आणि अल्पवयी बालिकांच्या गळयांत मिठ्या मारूं पहाणाऱ्या वृद्ध जाबुवंताकडून द्रव्याची गठडी घेऊन, त्या जिवंत मढ्याच्या गळयात आपली पोर बांधण्यास तयार होणाऱ्या कन्येच्या पित्यानीं यापासून योग्य तो बोध घ्यावा, एवढीच आमची त्यांना विनंति आहे ! असो.

आतां शेवटचा प्रश्न असा कीं, ही झाली सर्व विवाह करण्याबद्दलची चर्चा, म्हणजे तो करायचा असें गृहीत धरून त्याबद्दलच्या निरनिराळ्या प्रश्नाचा खल आपण येथवर केला !--परतु खुद्द तो विवाहच आधीं करायचा किंवा नाहीं, हाहि एक विचार करण्यासारखाच -प्रश्न नाहीं काय ? पविशेषतः, देशाच्या सांप्रत असलेल्या हलाखीच्या दारुण स्थितींत, शेकडोच नव्हे, तर हजारो आणि लाखो तरुणतरुणींची राष्ट्रकार्यास गरज

असतांना, त्या ब्रम्हचारी युवांना आणि त्या ब्रह्मचारिणी युवतींना, केवळ परंपरागत रूढीच्या बंधनांत मान अडकवून आपण आंधळ्यासारखे विवाह-बद्ध करावयाचें कीं काय, ह्याचा आपण विचार करावयास नको काय? स्वदेशासाठीं, स्वधर्मासाठीं, स्वसमाजासाठीं आणि स्वोद्धारासाठींहि ह्या अखंड ब्रह्मचर्यव्रताच्या शपथेवर आपलें दिव्य आणि उज्ज्वल आयुष्य नेणाऱ्या तरुण तरुणींची आज आपल्या देशास अत्यंत जरूर आहे, असें आमचें मत आहे! अर्थात् अशा उच्चध्येयानें प्रेरित होणाऱ्या कुमारिका कितीहि वृद्ध झाल्या, तरी चवचाल स्वार्थाला बळी पडलेल्या त्या पाश्चात्य राष्ट्रांतल्या "वृद्ध कुमारिका" नव्हेत, हें प्रस्तुत प्रश्नाची काळजी वहाणारांनी जरूर लक्षांत ठेवलें पाहिजे! त्याचप्रमाणें 'आपल्या आत्म्याशीं इमान' हा माझा या ठिकाणीं 'वांचूवर्ड'--म्हणजे परवलचा शब्द असून, तो वरील तरुणतरुणींनींच काय, पण जीवितयात्रा कंठणाऱ्या प्रत्येक जीवानें तो पाळला पाहिजे, अशा मताचा मी मनुष्य आहे! अर्थात् ही खबरदारी घेतल्यावर, आणि त्याचप्रमाणें शिक्षणाचीं आणि कार्यकर्तृत्वाचीं क्षेत्र शक्य तितकीं विभिन्न आंखून घेतल्यावर, मग त्या तरुणतरुणींच्या, युवक-युवतींच्या आणि ब्रह्मचारीब्रह्मचारिणींच्या हातून व्यभिचार होण्याचें कारणच नाहीं! आणि अशा प्रकारच्या व्यामोहाच्या सपाट्यात आपण सापडतो आहोंत असें कुणाला त्यांतूनहि दिसून आल्यास, त्यानें खुशाल विवाहाचा मार्ग धरावा, व समाजानेंहि त्याची 'छी थू' न करता उलट सहानुभूति-पूर्वक व सगौरव असा त्याच्या वैवाहिक जीवनास अवश्य अवसर द्यावा! अशा इसमांच्याकडे अहोरात्र विषयांत वळवळणाऱ्या नि लोळणाऱ्या समाजांतल्या क्षुद्र कीटकांनीं क्षुद्र आणि कुत्सित हास्याचे फवारे फेकीत पाहूं नये, तर आपल्यापेक्षां त्यांचें जीवन शतपट बरें आहे हें लक्षात ठेवून व लज्जेनें अधोवदन होऊन त्यांचा योग्य तो आदरसत्कार करावा, आणि लक्षांत ठेवावें कीं—

"Not failure but low aim is crime!"—

म्हणजे–" नोच्चार्थो विफलोऽपि दूषणपद दूष्यस्तु कामोलघु: "--हाच समाजांतील प्रत्येक व्यक्तीचा आज 'बीजमंत्र' होऊन, त्याप्रमाणें प्रत्येकानें वागण्यास तटकन् उठून प्रारभ करण्याचीच आज वेळ आली आहे ! एखाद्या विवाहितेनें नमस्कार केल्यास तिला " सौभाग्यवती हो " असा आशीर्वाद देण्यास मुळींच हरकत नाहीं, पण त्याच्या मागे आणि पुढें " अष्टपुत्रा " आणि " पुत्रवती " ह्या आशीर्वादात्मक पुत्राचें, म्हणजेच पुष्कळदा मुलामुलींचें लेंढार आणि खिल्लार जें आपण लावीत असतों, व जें पुष्कळदा सत्यसृष्टींतहि अवतरलेलें आपणांस दिसतें, त्याची आजच्या भीषण समाजस्थितींत काय खरें जरूर आहे ? अल्पवयी मुलाचें एक वर्षाच्या आत होणारें भयकर मृत्यूचें प्रमाण, आणि बाळंतपणाच्या पुनर्जन्माच्या यमयातनेच्या दुःखांत, त्या यमाच्या दाढेखालीं चिरडल्या जाणाऱ्या आणि क्षयरोगानें नि बाळंतरोगानें मृत्यु पावणाऱ्या स्त्रियांची छाती दडपून टाकणारी संख्या पाहूनहि अशा प्रकारचे आशीर्वाद देणारा इसम, एक तर परंपरेचा अज्ञानी दास, अथवा, स्त्रियांच्या बाबतींत मुळींच घृणा नसलेला निर्दय पाषाणच असला पाहिजे, यापेक्षां अधिक काय म्हणावें ? आज लक्षावधीच नव्हे, तर कोट्यवधि जनतेला पुरेसें पोटभर अन्न, वस्त्र आणि निवारासुद्धां मिळण्याची जेथें मारामार पडत आहे, तेथेंच, त्याच खटल्यात अजून लक्षावधि नि कोट्यवधि पोराबाळांचे खिल्लार लोटण्यास बिनदिक्कत तयार होणाऱ्या आमची खरोखर धन्यच म्हणावयाची, यात शंका नाहीं ! यासाठीं आधीं विवाहच करावा कीं नाहीं, आणि केला तरीहि चारदोन मुलांच्यावर वाढ आपण करायची कां काय, याचा ज्याचा त्यानें विचार करावा, किंबहुना, त्या चारदोन मुलांचें प्रमाण आज योग्य मार्गानें म्हणजे खऱ्या ब्रम्हचर्यानें आपणांस जिथवर टाळतां येईल, अथवा पुढें ढकलता येईल, तेथवर आपण ढकललें पाहिजे, आणि स्वतःच्या स्वार्थी सुखांत आणि पोराबाळांच्या खातेऱ्यांत न लोळत पडतां देशाच्या, धर्माच्या आणि समाजाच्या कार्यास होईल तितका हातभार लावण्यास प्रथम आपण तयार झालें

पाहिजे, हेंच आमचें समाजातील प्रत्येक विवाहितास आणि अविवाहितास या कामीं अखेरचें सांगणें आहे! पण इथेंहि शेवटीं आम्हांस हेंच म्हणावयाचें आहे कीं, वैवाहिक प्रश्न हा असा इतका महत्त्वाचा आणि इतक्या विविध अंगांनीं व्याप्त असूनहि, आज आमच्या देशांत कविवर्य टिळक म्हणतात त्याप्रमाणेंच—"हौस पुरवावी खेळ करुन घ्यावा। पुढें नशिबाला दोष सर्व द्यावा ॥"—असाच शोचनीय देखावा घरोघर दृष्टीस पडत नाहीं काय? हरहर! कोण ही स्थिति! सद्‌गृहस्थहो! याचा तुम्हाला उबग कधीं येणार? असो. आतां कुटुंबांतील प्रत्येक व्यक्तीची व विशेषतः त्यांतील पुढारी गृहस्थाश्रमीयाची सामाजिक इतर कर्तव्यें व राष्ट्रीय कर्तव्यें काय आहेत, तें पुढील भागांत सांगण्याचें आश्वासन देऊन, वाचकांना थोडी विश्रांति देतो!



नक्षत्र १० वें

## कौटुंबिक, सामाजिक व राष्ट्रीय कर्तव्यें ! (पुढें चालूं)

उठा, वाचक ! बस् झाली ही विश्रांति ! ते पहा इतर सामाजिक आणि राष्ट्रीय प्रश्न आपणास कळवळ्यानें हाका मारीत आहेत !--तर आता आपण तिकडेच वळूया ! एच्. जी. वेल्सनें कल्पिलेल्या " टाईम-मशीन " वर तुम्हांला बसवून गेल्या २५ वर्षांत वेळोवेळीं ऐकू आलेले ध्वनि मी तुम्हांस ऐकवितों. नीट ध्यान द्या !--ऐका ! हे कसले बरें ध्वनि आपल्या कानावर येऊन आदळत आहेत ? हा ' केसरी 'चा घनगंभीर ध्वनि, ही खोताची ' रणगर्जना, ' आणि तेजस्वी वेदाची वाणी सांग-णारा व पाठीवर धनुष्यबाण घेतलेला हा 'शापादपि शरादपि' 'श्रद्धानंद' आपणास कोणता बरें ' संदेश ' आणून पोहचवीत आहे ! ' सावधान, ' ' सावधान ' हे शब्द आपणास कोठून बरें ऐकू येत आहेत ? काय ! हे भटजींच्या मंगलाष्टकातील शब्द आहेत काय ? नव्हे, हे भटजींच्या मंगलाष्टकांतील शब्द नव्हेत ! तर, ' म्लेंछ दुर्जन उदंड । बहुता दिवसांचें माजलें बंड । याकारणें अखंड । सावधान असावें ! ॥ "--अशा प्रकारचें जागृतीचें रणशिंग वाजवून मुसलमानांच्या हरघडीस आणि हरदम होणाऱ्या अत्याचाराविरुद्ध प्रत्यक्ष रामदासस्वामींचे—अदृश्य स्वरूपांत हिंडणाऱ्या या समर्थ माउलीचेच हे शब्द होत, यांत शंका नाहीं ! बदलत्या काळाला आपण कोणता ' पुरुषार्थ ' गाजविला पाहिजे, आणि ' वैनतेया'च्या झडपीनें ' स्वधर्म, ' आणि ' स्वराष्ट्र ' यांच्या प्राप्तीसाठीं हातांत ' भाला ' घेऊन आपण कोणत्या प्रकारचे यत्न केले पाहिजेत, यासंबधीं-च्याच ह्या आरोळ्या एकसहा आपल्या कानावर येऊन आदळ आहेत ! त्यांतच एकाद्या ' चांदणी'ची चमक, एकाद्या ' दुनिये 'ची दौलत, आणि ' मनोरंजन 'कारक ' करमणुकी'च्या ' मौजा ' आणि

'नव्या मौजा' यांचा मधुर, स्निग्ध, कलकलरव आपल्या कानीं येत आहे! तथापि, सध्यांच्या धामधुमीच्या काळीं आपणाला तिकडे लक्ष देण्यास सवड नाहीं! यासाठीं उपरिनिर्दिष्ट धीरगंभीर घनगर्जीतांकडेच आतां आपण पाहूंया, व ते आपणाला काय सांगताहेत तें ऐकूंया!

पहिला आणि सर्वांत महत्त्वाचा प्रश्न म्हणजे शुद्धिसंघटनाचा होय! या महत्त्वाच्या कार्याच्या पायीं स्वामी श्रद्धानंदासारखा हिंदुधर्माचा खंदा वीर बळी पडला, व इतरहि दहाबारा आर्यसमाजी स्वामींना रक्तपिपासु आणि परधर्मासहिष्णु अशा धर्मवेड्या मुसलमानांनीं कंठस्नान घातलें; परंतु सांगण्यास अत्यंत आनंद वाटतो कीं, तरीहि या शुद्धीचें कार्य एक तसूभरहि मागें न हटतां उलट तें दिवसेंदिवस अधिकाधिक वाढत्या जोमानें आणि उत्साहानें पुढें पुढेंच जाऊन स्वामी श्रद्धानंदांनीं हौतात्म्यापूर्वीं आपल्या चाळीस हजार मलकांना रजपुतांना शुद्ध करून घेतलें, आणि त्यानंतर गोव्यामध्यें झालेल्या ५००० गावड्यांच्या शुद्धिकरणाचा समारंभ विनायकबुवा मसूरकर,रामदासी, यांनीं जो प्रचंड प्रमाणावर घडवून आणला, त्यामुळें तर या प्रश्नाला विशेषच चालना मिळून, त्याच्या लाटा जागोजाग उसळत राहून,आणि ठिकठिकाणीं स्थापन झालेल्या हिंदुसभांच्या प्रचारकांनीं आणि त्याहून शतपटीनें जास्त स्वामी दयानंदजींच्या आर्यसमाजी अनुयायांनीं, हें दयेचें कार्य सर्वत्र अत्यंत जोरानें, धिमेपणानें, आणि चिकाटीनें चालविलें, आणि डॉ. मुंजे व डॉ. कुर्तकोटी ह्यांच्यासारखे 'डॉक्टर्स' समाजाला 'शुद्धी'वर आणण्यास मिळाले, हीहि पण आनंदाची आणि तितक्याच अभिमानाची गोष्ट आहे! आतां त्या कामीं आपणा गृहस्थाश्रमीयांचें कर्तव्य इतकेंच कीं, वरीलप्रमाणें शुद्धीकृत झालेल्या समाजाशीं आपण अत्यंत सहानुभूतीचें वर्तन ठेविलें पाहिजे, आणि वेळोवेळीं त्यांस जरूर ती मदतहि शक्य तितकी केली पाहिजे! ती इतकी कीं, आपण हिंदुधर्माचा स्वीकार केला आणि परत हिंदुधर्मांत आलों, याबद्दल त्यांस केव्हांहि पश्चात्ताप वाटतां

कामा नये! याप्रमाणे आपण वागलों, तरच आपण त्या कामीं आपलें कर्तव्य बजावलें असें होणार आहे, हें उघड आहे! याशिवाय लेखन-संभाषणद्वारा आपण प्रस्तुत कार्याबद्दलची माहिती आपल्या इष्टमित्राना आणि अज्ञ बाधवाना देऊन,त्याच्या मनात त्याविषयीं सहानुभूति उत्पन्न करण्याचा अहर्निश प्रयत्न करणें,हेंहि आपलें कर्तव्य ठरत आहे,यात शंका नाहीं! असो. शुद्धीच्या पाठोपाठ येणारा आणि उच्चारला जाणारा दुसरा प्रश्न म्हणजे संघटनाचा होय! संघटन आणि शुद्धी ही जुळीं भावंडें होत! तथापि, समग्र हिंदुसमाजाचें खरें संघटन होण्यास त्या समाजाला, आपल्या जाति-भेदाच्या खऱ्या स्वरूपाची जाणीव व्हावयाला पाहिजे आहे, तरच तें सघटन खरें आणि चिरस्थायी स्वरूपाचें होईल, नाहींतर तें शक्य नाहीं! या जातिभेदाचा प्रश्न इतका महत्त्वाचा आहे कीं, आताच सागितलेली सघटनाचीच बाब नव्हे, तर यापुढचा प्रश्न जो अस्पृश्यतानिवारण, तोहि पण या जातिभेदाच्या प्रश्नाच्या व्यवस्थित सोडवणुकीवरच अवलबून असल्यामुळें, त्या जातिभेदाचाच आपण प्रथम विचार करू या! आणि नतर सघटन आणि अस्पृश्यतानिवारण यावर चार शब्द बोलू!

आता प्रथमत: मला येथें हें सागितलें पाहिजे की, अस्पृश्यता-निवारण, शुद्धिसघटन, जातिभेद, गोरक्षण, मद्यपाननिषेध, वगैरे ज्या प्रश्नाचा विचार मी प्रस्तुत करण्याचें ठरविले आहे, त्या सर्व विषयावर सविस्तर विवेचन मीं आपल्या ‘भारतवर्षाचा धार्मिक इतिहास’ या नावाच्या पुस्तकात, चालू प्रश्नाचा विचार करताना अगाऊच केलेलें अस-ल्यामुळें, पुनरुक्ति दोष टाळण्यासाठीं येथें फक्त त्याची थोडक्यांत रूपरेषाच सागणार आहें! तथापि, त्यावरूनहि सुज्ञ वाचकाना त्या त्या बाबतींत माझें काय म्हणणें आहे, हे स्पष्टपणें कळून येईल, अशी माझी खात्री आहे! अधिक सविस्तर विवेचन वाचकानीं वरील ग्रथांत अवश्य पहावें! असो.

तर प्रथम आपण जातिभेद घेऊं! या जातीभेदासंबधानें वाचकांनीं

इतकेंच लक्षांत ठेवावयाचें कीं, 'शरीराचे जसे हस्तपादादि चार अवयव त्याचप्रमाणें समाजपुरुषाच्या देहाचे ब्राम्हण क्षत्रियादिकरून चार वर्ण हे चार अवयवाप्रमाणे होत! ही कल्पना मी म्हणजे कांहीं नव्यानें सांगतों आहें असें नाहीं; तर ती आपल्या वेदकालीन 'पुरुषसूक्त' नामक उच्च दर्जाच्या गीतांमध्येहि गोविलेली आहे! त्यामध्ये समाजपुरुषाच्या विराट देहाचे वर्णन करून त्या 'पुरुषसूक्ता'चा गायक कवि आपणांस हेंच सांगत आहे कीं, त्या विराट पुरुषाच्या विशाल देहाचे मस्तकाचे ठायीं ब्राह्मण असून, क्षत्रिय हे त्याचे बाहू होत, वैश्य हे त्याचें उदर होय, आणि शूद्र हे त्याच्या पायाच्या ठिकाणीं आहेत! अर्थात् उत्तमांगाचे म्हणजे मस्तकाचे ठायीं यद्यपि ब्राह्मण वर्गाची स्थापना झालेली असली, तरी पण पाया-वांचूनचें शरीर म्हणजे लंगडेंच नव्हे काय? आणि हातावांचूनचा देह थोटाच नव्हे काय? आणि अशा देहाचीं प्रत्येकांनीं कीव करण्याच्या लायकीचाच मग तो देह होणार नाहीं काय? "पोट आणि अवयव" या नांवाच्या प्रसिद्ध गोष्टींतील रहस्य हेंच आहे! एकदां पोटावर इतर अवयव रुसले. हात म्हणाले, 'आम्ही सर्व मिळवावें आणि या पोटोबानें एकट्यानें बसून खावें, हें आपण नाहीं चालू देणार!' इतर सर्व अव-यवांनींहि त्याला संमति दिली. आणि सर्वांनीं मिळून पोटावर रुसवा केला. पण त्याचा परिणाम काय झाला? तर शरीर हळूहळू रोडावत आणि खगत जाऊन मृत्यूच्या पथास लागलें! गोष्ट साधीच आहे; पण तींत संघटनेचें तत्त्व किती उत्कृष्ट सांठविलें आहे बरें! यासाठीं कविवर्य टिळकांप्रमाणेच आपणहि म्हटलें पाहिजे, कीं—"मी ब्राह्मण वा महार मी। गणी न कवणाळाच कर्मी॥ मलांत पडलें, खनींत दडलें, मुकुटीं जडलें, अवघें उचलून घेइन मी। जन्मभूमिसेवाधर्मी॥."-- संघटन म्हणजेच सहकार्य! आणि तेंहि साधेंसुधें नसून, ज्याप्रमाणें शरिरांतील चारी अवयवामध्यें एकच रक्त असतें, त्याचप्रमाणें समाजपुरुषाच्या चारी अवयवांतून—म्हणजेच ब्राह्मणक्षत्रियादि चार जातींतून—प्रेमाचें, सलोख्याचें आणि सहानुभूतीचें

जिवंत रक्त एकसारखें वहात राहिलें पाहिजे!— इतकेंच नव्हे, तर धडधाकट शरिरांतील रक्ताचा पुरवठा अत्यंत शुद्ध, निर्मळ, आणि लालबुंद अशा स्वरूपाचा असतो, त्याचप्रमाणें हें जातीजातींमधील प्रेमहि, जर समाज-पुरुषाचा देह धडधाकट आणि कर्तृत्ववान् राखावयाचा असेल तर, अत्यंत शुद्ध, निर्मळ, आणि अनुरागयुक्त असलें पाहिजे, हें उघड आहे! आतां आतां साम्याची बहारच दाखवावयाची तर अनुरागाचा रंग रक्तवर्ण असता, हें प्रिय वाचकांना माहीतच आहे! पण इतकें असलें तरी—एकाच प्रेमाचा आणि सहानुभूतीचा धागा सर्व शरिरांत खेळत असला तरी—डोकें म्हणजे हात नव्हेत, हात म्हणजे पोट नव्हे, आणि पोट म्हणजे पायहि नव्हेत हें प्रत्येकानें लक्षांत ठेवलें पाहिजे! अर्थात् विचार करण्याचें, ज्ञानाचें आणि युक्त्या शोधून काढण्याचें काम हें डोक्याकडे येत असून संकटनिवारणार्थ पुढें सरसावून जाण्याचें काम बाहू करीत असतात, व सर्व प्रकारची अन्न-सामुग्री एकत्रित करून त्यांचा रस शरीरपोषणार्थ सर्व अवयवांना पोंच-विण्याचें कार्य पोट करीत असून डोकें, हात आणि पोट या सर्वांना सुखानें इष्ट स्थळीं वाहून नेण्याचें काम पाय करीत असतात! अर्थात् एका व्यक्तीच्या देहांत हे चार अवयव जितके सहज रीतीनें, अगदीं आपला जन्मजात गुण म्हणून हें कार्य करितात, तितक्याच सहज रीतीनें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, आणि शूद्र या चार वर्णांनींहि वर सांगितलेलीं आपापलीं कर्तव्यकर्में बजाविलीं पाहिजेत, तरच सर्व समाजपुरुषाचा देह हा उत्तम आणि खणखणीत राहील, हें उघड आहे! परंतु सध्यां जर आपण आपल्या समाजाकडे दृष्टिक्षेप केला, तर वरील "पोट आणि अवयवां"तल्या गोष्टींसारखीच त्याची स्थिति झालेली आहे, असें आपणांस दिसून येईल! अशाप्रकारची दिशाभूल प्रस्तुतसारख्या स्वातंत्र्योत्तर काळींहि व्हावी, ही अत्यंत शोचनीय गोष्ट होय! आणि यांतून आपण वेळींच सावध न झाल्यास आपल्या स्वातंत्र्यलक्ष्मीचा मालिदा परके चोर लुटण्यास

सदैव तयारच आहेत, किंबहुना, पाकिस्तानरूपानें त्यांनीं तो थोडाबहुत लुटलाहि आहे! आणि आपण लवकरच शुद्धीवर न आल्यास ते तो यापुढेंहि असाच अधिकाधिक लुटीत रहातील, यात शंका नाहीं! यासाठीं अशी अवस्था होऊं नये म्हणून वर सांगितलेल्या चार जातींना आपापल्या कर्तव्याची योग्य ती ओळख आणि जाणीव करून देणें एवढेंच आपल्या हातीं आहे, आणि तें आपण अहर्निश केलें पाहिजे, तरच आपण त्या कामीं आपलें कर्तव्य बजावलें असें होणार आहे! अर्थात् इतकी जागृति झाल्यानंतर, 'पायास काटा बोंचला असतां डोळ्यास पाणी येतें' हा व्यक्तिविषयक अनुभवच समाजाच्या बाबतींत दृष्टीस पडून अस्पृश्यतानिवारणाचें कार्यहि तडाख्यासरशीं होऊन जाईल, हें सागणें नकोच! आज जर तें कोठें नडत असेल तर तें या सहानुभूतीच्या अभावाचे पायींच नडत आहे, हें उघड आहे. परंतु वरील उपमा एकदा अंतःकरणात थरारली आणि रोमरोमांत भिनली, म्हणजे तेथील उपेक्षेच्या रुक्ष वाळवंटात सहानुभूतीचे निर्मळ झरे झुळझुळ वाहूं लागतील, आणि त्याच्या त्या निर्मलोदकांत अस्पृश्यतेचा हिंदुधर्मावरील कलंक पार धुवून जाऊन हिंदुधर्म निष्कलंक होईल, व "अलांछित चंद्रम्या"प्रमाणें तो जगदाकाशाच्या विस्तीर्ण आणि नील नभोमंडलात आपल्या उज्ज्वल सौंदर्यानें अधिकच झळकत आणि तळपत राहील, यांत शंका नाहीं! परंतु, 'अस्पृश्यतानिवारणा'चें कामहि शेवटीं आपल्या सरकारास कायद्यानेंच करावें लागलें, यावरून आपण आपल्या खऱ्या कर्तव्याला आजवर किती जागलों होतों, म्हणजेच किती निर्घृणपणें विन्मुख झालों होतों, हेंच सिद्ध होत नाहीं काय! फार काय सांगावें, पण याच आपल्या निर्घृणतेपायीं, 'आधुनिक संत' म्हणून ज्यांचा यथार्थ गौरव नुकताच झाला, त्या कै. साने गुरुजींना या कामीं आमरणांत उपोषणाचा सत्याग्रह पंढरीच्या परिसरात पतितपावन पांडुरंगापुढें करावा लागला, तेव्हांच त्या पांडुरंगाला कींव येऊन त्यानें या 'पांडुरंगाला' (पांडुरंग सदाशिव साने, यांना, म्हणजेच 'साने

गुरुजीं'ना ) यश मिळवून दिलेलें आहे, ही गोष्टहि आपल्या निर्घृणतेची सर्वोच्च साक्ष देत नाहीं काय ? खरोखर धन्य असो आम्हां सनातनी लोकाची कीं, आम्ही आपल्या फाजील शहाणपणानें, म्हणजेच मूर्खपणानें, ' देव बाटला ' म्हणून प्रत्यक्ष देवालाहि धुवून घेण्यास कमी करीत नाहीं—आजवर कमी केलें नाहीं ! वास्तविक, भक्तिप्रेमानें दिलेलीं शबरी भिल्लिणीचीं बोरेंहि ज्या प्रभु रामरायानें आवडीनें खाल्लीं व " स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् " म्हणून ज्या भगवंतांनीं छातीठोक आश्वासन देऊन आपल्या ' पतितपावन'त्वाचें ब्रीद राखलें, त्याचे खरे भक्त म्हणवून घेण्यासहि आम्हास लाज वाटली पाहिजे ! असो. यापुढें तरी ती वाटेल, व सरकारनें केलेल्या कायद्याच्या अंमलबजावणीस, केवळ ' कायदा केला ' म्हणून नव्हे, तर खऱ्याखुऱ्या तत्वज्ञानाची ओळख पटून आमचे सनातनी बांधव सहाय्य करतील, अशी आम्हांस आशा आहे !

आता पुढचा प्रश्न अनाथालयें, अनाथविद्यार्थीगृहें आणि अनाथविद्यार्थिनीगृहें याच्यासंबंधींचा होय ! हिंदुधर्मावर गुप्त वा प्रगटपणें घाले घालून त्याचे लचके तोडण्यास तयार झालेल्या ख्रिस्तीमिशनऱ्यांच्या कळपापासून आणि महंमदीय तंजीमूतबलीघच्या अनर्थांपासून गरीब आणि एकट्याटुकट्या असहाय आणि अनाथ अशा अबलेला, अर्भकाला वा इसमाला योग्य तो थारा देऊन त्याचें त्या आघातापासून रक्षण करण्यासाठीं आजकालच्या युगांत या अनाथालयांची जरुरी किती उत्पन्न झालेली आहे, हें दररोज घडून येणाऱ्या अत्याचाराचा इतिहास आपणास कंठरवानें सांगतच आहे ! तरी या " भयसूचक घंटे"कडे लक्ष देऊन प्रत्येक जिल्ह्याजिल्ह्याला आणि तालुक्यातालुक्याला अशा प्रकारचीं ' अनाथालयें ' निघणें दिवसेंदिवस अधिकाधिक जरूर होत चाललेलें आहे, हें सर्व सद्गृहस्थानीं लक्षांत ठेवावें, आणि गांवोगांव स्थापन झालेल्या हिंदुमहासभेच्या शाखा जरी तें काम थोडेंबहुत करीत असल्या, तरी अशा प्रकारचे ' अनाथाश्रम ' स्वतंत्रपणें याच कार्यासाठीं कसे निघतील, व कर

सांगितलेल्या चोरांच्या टोळधाडीपासून हिंदुसमाजांतील जीवाचें संरक्षण तें अधिकाधिक कार्यक्षमतेनें कसें करीत रहातील, यांकडे आपण लक्ष दिलें पाहिजे, व त्याकामीं शक्य तितकी सहानुभूति उत्पन्न करणें व शक्य तितकें सक्रिय सहाय्य देणें हें आपणापैकीं प्रत्येकाचें कर्तव्य आहे, हें लक्षात ठेविलें पाहिजे ! अशा प्रकारचीं अनाथालयें आणि अनाथाश्रम काढण्याचा उपक्रम आपल्या देशांत कुठें कुठें सुरूं झाला आहेच ! तोच सर्वत्र फैला-वून त्यानें उपरिनिर्दिष्ट कार्य केलें पाहिजे, किंबहुना, त्याच्याहि पुढें जाऊन ख्रिस्ती मिशनहाऊसच्या धर्तीवर हिंदु मिशन हाऊसमध्यें त्याचें रूपांतर होऊन तें कार्य त्यांनीं बजावलें पाहिजे, तरच आपल्या समाजाचा सर्वां-गीण उद्धार होईल हे उघड आहे ! अर्थात् देशांतील श्रीमंत धनि-कांच्या पैशाचा ओघ इकडे वळला पाहिजे, तरच हें कार्य सुलभतेनें आणि सौकर्यानें होणार आहे ! सामान्य सद्‍गृहस्थांनींहि त्याकामीं काय करावें तें वर सांगितलेंच आहे. असो.

पण ही झाली बाह्य परिस्थितीशीं झगडण्याची गोष्ट ! पण आंतरिक परिस्थितीहि तितकीच भीषण आणि भयाण आहे, हें प्रत्येक सहृदय मानवाच्या सूक्ष्म दृष्टीला दिसल्यावाचून रहाणार नाहीं ! गरीब आणि श्रीमंत यांच्यामधील भीषण तफावतीचें दृश्य मीं वर एकदोनदां रेखाट-लेंच आहे ! त्याचीच पुनरावृत्ति आपणास ह्या गरीब अनाथ विद्यार्थ्यांच्या दारिद्र्यदुःखांत,—आणि पचपक्वान्नाची रोज झोड उठवून तगडीवर तंगडी टाकून लोळणाऱ्या लक्ष्मीधर लक्ष्मीपुत्रांच्या सुखैश्वर्यांत,—दिसून येणार आहे ! पण देशाचें दैन्य नाहींसें करून, त्याचे पाश तोडण्याचें काम असे लक्ष्मीधर करीत नसून, परिस्थितीशीं झगडत आणि ठकरा घेत आपल्या शुद्ध सत्वगुणसुवर्णानें वर येणारे धैर्याचे मेरुमणीच तें काम उरकीत असतात हें लक्षांत ठेवून, अशा भावी वीरांना आपण किती बरें साहाय्य केलें पाहिजे ! "हिरकणी" कार रा. यशवंत गोपाळ जोशी आपल्या "हिरकणीं"त म्हणतातः—

" आम्हा आर्यांची दैन्यावस्था दाखवावयास वक्त्याची व विद्वानांची व्याख्यानेंच कशाला हवींत ? रस्त्यांतून वणवण करणारा मधुकरीसुद्धा देशाच्या दैन्यावस्थेचें चित्र हृदयावर ठसवील ! मधुकरी म्हणजे आमच्या दैन्यावस्थेचं मूर्तिमंत चित्र ! पण मधुकरी म्हणजे जसं दैन्यावस्थेचें चित्र तसेंच आर्यांच्या भावी कर्तबगारीचा आधार म्हणजे हीं मधुकरी—
—हीन—दीन—बालकें ! आगरकर—टिळक—गोखले या त्रयमूर्तिचा अवतार पुन्हा पहावयाचा असेल तर मधुकऱ्याना—अनाथ बालकाना हात द्या ! आज लक्षावधि टिळक, आगरकर, गोखले रस्तोरस्तीं फिरत आहेत ! "
ह्या शेवटच्या वाक्यावरून आम्हास स्वामी विवेकानदाच्या एका वाक्याची आठवण झाली! ते म्हणतात—" तुम्हाला देव प्रसन्न व्हावा अशी इच्छा आहे काय ? तर मग ह्या चालत्या बोलत्या देवांना तुम्ही आधीं प्रसन्न करा ! "
महात्माजींचा " दरिद्री नारायण " शब्द याच घर्तीचा आहे ! असो. पण अशा गरीब आणि अनाथ लेकराना—राष्ट्राच्या या भावी आधारस्तभाना आपण किती बेगुमानपणे वागवितो बरें ? तीं गरीब मधुकरी पोरें पहा. त्यांची तीं खपाटीं गेलेलीं पोटें, क्षुधेनें व्याकुळ होऊन कावरीबावरी होणारी त्यांची ती नजर आणि क्षुद्र अन्नाच्या तुकड्यांचा थर तळाशींच दिसणारी त्यांची ती ' उलटी अंबारी ' पाहिली,—ज्यानीं खरोखर हत्तीच्या अंबारींतून मिरवावें त्यांच्याच हाती ती चौपदरी पाहिली,—म्हणजे चित्ताची किती कालवाकालव होते, तोंडातला घास कसा तोंडातच फिरूं लागतो--आणि घशाशीं अडूं लागतो, ह्याचें सहृदय वाचकाना अधिक वर्णन करून सांगायला हवें काय ? प्रिय वाचक ! " हिरकणी "तल्या ' मधुकरी ' या प्रकरणातलें रा. जोशांचीं हृदयकपाटें भेदून बाहेर पडलेले खालील बोल वाचा, आणि ते तुमचींहि हृदयकपाटें तशीच भेदीत नाहींत काय, ते मला सांगा पाहूं ?—

" तें मधुकरी बाळ काय म्हणालें ? " मला भूक लागलीय ! "
पंचिमण्या राजसा, ईश्वराच्या अंशा, खरंच कां तुला भूक लागलीय ?—

पण—पण—पण—!!! तुझ्यांत वावरत असलेल्या ईश्वरी चैतन्याची भूक दैन्यांत वावरत असलेल्या या दुर्दैवी देशाला कुठें अजून भासू लागली आहे ? तुझ्यांत वावरत असलेल्या आर्यांच्या कर्तबगारीची जाणीवच कुठेरे अजून तुझ्या देशबांधवांना उमगली आहे ? नुकताच तुझा देश निद्रेतून उठत असल्यामुळें १२ची जाणीव देशाला अजून नाहीं !" प्रियवाचक! ही जाणीव आपणामध्यें कधीं बरें येणार ? विशेषत: धनिक व श्रीमान् वाचकांना आणि सद्‌गृहस्थांना माझा असा सवाल आहे कीं, "महाराज, ही गरिबांचीं दु:खें आणि देशाच्या कर्तबगारीचा हा नाश तुम्हास कधीं दिसणार ? तुम्हीं कधीं पुरते जागे होणार ? आणि गरिबांच्या वाराची जाणीव तुम्हांला कधीं होणार ? त्या वाराची जाणीव होऊन त्याच्या वाराची व्यवस्था लागूनच हें कार्य भागणार आहे काय ? सामान्य संसारी सहृदय जीव सुद्धां असे गरीबांचे वार लावीत असतात। पण अशा वारानेंच केवळ त्यांचें दैन्य वारलें जाणार आहे काय ? त्या कामीं गावोगांवीं एक एक "अनाथ विद्यार्थीगृह" निघण्यास नको काय ? मग या कामींआपण कधीं पुढें येणार ? आपण आपल्या चैनी टाकून देऊन त्या गरीबांच्या—गरीब विद्यार्थ्यांच्या—राष्ट्राचे भावी आधारस्तंभ अशा त्या कोंवळया जीवांच्या सहाय्यार्थ कधीं बरें धांवून जाणार ? शेतकऱ्याचे डोळे जसे मेघाकडे लागलेले असतात, तसेंच ह्या गरीब बापड्या दीन अर्भकाचे नेत्र आपल्या कृपामृताच्या वर्षावाकडे लागून राहिलेले आहेत ! मग केवळ "गर्जन्ति केचिद्‌वृथा" अशी वृत्ति सोडून देऊन, तुम्ही आपल्या सपत्नीचा पाऊस त्यांच्या दारिद्र्यभूमीवर पाडून, त्यातून कर्तबगार कसाचे दाणे—देशाचे भावी वीर—कधीं निर्माण करणार ?

जी अनाथविद्यार्थ्यांची स्थिति तीच—किंबहुना—कांकणभर जास्तच—अनाथ विद्यार्थिनींची अवस्था ! स्त्रीजन्माच्या पाठोपाठ जीं हजारों दु:खें मग्रूर मानवांनीं आपल्या निर्दय आणि निर्घृण कायद्यांनीं, रुढींनीं, आणि चालींनीं त्यांच्या मागें लावून दिलीं आहेत,त्यांतच त्या गरीब बापड्या

पोरीच्या अनाथपणाची भर पडल्यावर मग तर काय, विचारावयासच नको! त्या अनाथ बालिकेच्या पाढऱ्या फटफटीत कपाळाकडे पाहून तिची अधिकच कींव करायचे सोडून, तिच्याकडे पापी नजरेची फेक करीत आम्ही आपल्या पाजीपणाचें प्रदर्शन मात्र सभ्यपणाच्या नावाखालीं गुप्त वा प्रगटपणें तिचपुढें करीत असतों! आणि अशा स्थितींत तिचें पाऊल वाकडें पडल्यास, तिच्या पातिव्रत्यावर दरोडा घालणारे आम्ही 'चोर'च पुन्हा 'उलट्या बोंबा' मारीत उठत असतों! आहे कीं नाहीं जगाचा उलटा न्याय? "सहा सहा महिन्याचीं पोरं नरडीला नख देऊन केराच्या पेटीजवळ पडलेलीं असतात, हा काय केवळ एकट्या स्त्रियांचा दोष? गर्भधारणा स्त्रियास न होता जर पुरुषास होती, तर अशीं नखें लावललीं पोरं सहा सहा महिन्यानीं एक एक मरून पडण्याऐवजीं दिवसातून सहा सहा पडलीं असतीं!"—इतके तर आम्ही पशूहून पशू आहोंत, आणि असें असूनहि उलट "व्यभिचारिणी" म्हणून त्या स्त्रियांच्याच नावाचा डंका पिटण्यास आम्हास तिळभरहि शरम वाटत नाहीं! पण व्यभिचार करण्यास स्त्री आणि पुरुष हीं दोघेहि लागत असतात, ही साधी गोष्टहि "स्त्रीजात तितकी बेहराम!"—ह्या हॅम्लेटच्या शब्दावरोबर टाळयाचा कडकडाट करणाऱ्या आम्हा प्रेक्षकाना समजत नाहीं! आम्ही त्या पत्नीच्या टाळ्या आम्ही आपल्यालाहि तितक्याच घेत असतो याची यत्किंचित् जाणीव जर अम्हास त्या वेळीं होईल, तर त्या टाळयांचा जोर निम्मा तरी कमी झाल्यावांचून खास राहणार नाहीं! असो. तर सांगण्याचा भाग असा कीं ही सर्व दृष्टि साफ बदलून जाऊन त्या 'अनाथ बालिका'च्या उन्नत्यर्थ आपण जागोजाग 'आश्रम' स्थापन केले पाहिजेत, व तेथं त्यांची योग्य ती सोय लावून दिली पाहिजे व राष्ट्रकार्यार्थ विविध शाखांमध्यें जरूर असणाऱ्या स्त्रीस्वयसेविका निर्माण करण्यास आपण कायावाचामनानें व धनानेंहि पण झटलें पाहिजे!—विशेषतः धनिक श्रीमंतांनीं हें कार्य अवश्य बजाविलें पाहिजे!

पण ‘ अनाथ ’ म्हणजे केवळ ‘ पतिहीन ’ असाच अर्थ न घेतां, ‘ अनाथ विद्यार्थी ’ ह्यात जो ‘ अनाथ ’ शब्दाला अर्थ आहे, तो अर्थ लावूनहि तशा प्रकारच्या असहाय व गरीब कुमारिकांच्या पालनपोषण-शिक्षणादिकाची व्यवस्था करण्यासाठीं ‘ अनाथविद्यार्थीगृहा’प्रमाणेंच ‘ अनाथ विद्यार्थिनीगृह’हि पण निघालें पाहिजे!—इष्ट वाटल्यास त्याचा समावेश ‘ अनाथ बालिकाश्रम ’ ह्या संस्थेंत केला तरी हरकत नाहीं. पण सांगण्याचा हेतु इतकाच कीं, मुलींच्या बाबतींत ‘ अनाथ ’ म्हटल्या-बरोबर साहजीक जो अर्थ डोळ्यापुढें उभा राहतो, तेवढा संकुचित अर्थच न घेता, व्यापक अर्थ घेऊन जरूर तर त्यासाठीं तशी स्वतंत्र संस्थाहि काढली पाहिजे ! अर्थात् हें काम देशातील गरीब कुमारिकांची कळकळ वाटणाऱ्या एखाद्या श्रीमंत पण स्वार्थत्यागी स्त्रीनेंच हातीं घेतलें पाहिजे, हें उघड आहे ! म्हणजे ‘ अनाथ विद्यार्थीगृहा’स जसे केतकर, तशाच कोणी श्रीमती सौभाग्यवती, अगर ,तुसल्याच श्रीमती अशा संपन्न भगिनीनें हें काम हातीं घेतलें पाहिजे, व तें नेटानें तडीला नेलें पाहिजे, तरच गरी-बांच्या कर्दमात उगवलेल्या कन्यकाकुसुमाचें योग्य तें चीज आपण केल्यासारखें होईल ! नाहीं तर—“ फुले कुसकारिलीं । कुणि ग मेल्यानं पायदळीं तुडविलीं ॥ ”—असाच प्रकार दृष्टीस पडल्यावाचून कसा राहील ? असो.

यानंतरचे विचार करण्यासारखे सामाजिक दोन प्रश्न म्हणजे गोरक्षण आणि मद्यपाननिषेध हे होत ! श्री. चौंडेबुवा, गोरक्षण कचेरीचे रा. दांडेकर वगैरे मंडळी गोरक्षणार्थ किती अविश्रांत खटपट करीत-झटत आहेत, व मद्यपानबंदीसाठीं खुद्द कै. लो. टिळकांच्या अमदानींत सन १९०८ च्या सुमारास ‘ पिकेटिंग’च्या जोरावर दारुचे पिठे कसे रिकामे पाडले जात होते, याचा स्फूर्तिदायक इतिहास सर्वांना माहितच आहे ! कै. शंकरराव लवाटे यांनीं त्यानंतरच्या अमदानींत याच कामीं

किती खटपट केली, तेंहि आपणास ठाऊकच आहे! पण देशाच्या दुर्दैवाची गोष्ट की, स्वद् आपले दिवाण जरी अबकारी खात्यावर नेमले गेले होते तरी तेंहि आकड्याच्या गौडबंगालात आणि नोकरशाहीच्या कचाटाळात फसून आपण 'प्रधान'पदाला नालायक आहोंत, असेंच सिद्ध करीत होतें! असो. त्यानंतर महात्मा गांधींच्या विविध कार्यक्रमांत ह्या चळवळीला कसा जोर आला होता, तो आपणास ठाऊकच आहे! पण स्वराज्यप्राप्तीनंतर मद्यपानबंदीचा कायदाच शेवटीं मुंबई सरकारास करावा लागला ना? तथापि, सरकारची अपेक्षा अशीच आहे कीं, सामान्य जनतेला हा मोहच होणार नाहीं अशा प्रकारची त्या लोकांची संस्कृतीच आपण उच्च दर्जाची करण्याचा, इतर सर्व गोष्टीप्रमाणेंच, याहि बाबतींत प्रयत्न केला पाहिजे, तरच हें कार्य कायम स्वरूपाचे व आमूलाग्र होणार आहे, ह्यात शंका नाहीं!—व म्हणूनच आपण सरकारला या कामीं शक्य ती मदत केली पाहिजे! गोरक्षणाचा विषय घेतला, तरी त्यातहि मुसलमान व इंग्रज हे गोवध करणारे कसाई आपल्या देशात आजवर प्रामुख्यानें होते. त्यामुळें संपूर्ण गोरक्षणाचा प्रश्न फार अवघड होऊन बसला होता. पण आता तो त्या मानानें सुलभ झाला असला, तरी सरकारपुढें असलेल्या अनेक महत्त्वाच्या व खर्चाच्या प्रश्नांपैकींच हाहि एक प्रश्न असल्यामुळें, सरकारला व चौंडेमहाराजांसारख्याच्या खटपटीला आणि अविश्रांत श्रमाला होईल तो हातभार आपण लावला पाहिजे! ज्याना शक्य असेल त्यानीं गोपालन प्रत्यक्ष करावें, निदान जागोजाग गोशाळांची स्थापना होण्यासाठीं खटपट व त्या कामीं यथाशक्ति मदत आपण केली पाहिजे! अर्थात मुख्यतः हीं सर्व कामें श्रीमंत धनिकांचीं असून, त्याना त्यांच्या मोहनिद्रेंतून गदगदा हलवून जागृत करण्याचाच प्रयत्न प्रथम झाला पाहिजे! कारण, एकटादुकटा गरीब जीव त्या कामीं कितीसें सहाय्य करणार? आम्ही मागेंच सांगितल्याप्रमाणें साध्या संसाराप्रमाणेंच राष्ट्रसंसारासहि सुवर्णावांचून, द्रव्यावांचून, आणि धनावांचून जागोजाग अडून पडावें लागतें—राष्ट्राचा प्रपंच सुरळीत चालू

शकत नाहीं!—आणि म्हणूनच " शेतकी, गोरक्षण, आणि व्यापार " ही कर्तव्यकर्मांची त्रयी अत्यंत धनवान असा जो वैश्यवर्ग त्याचेच गळ्यात भगवंतांनीं दूरदर्शीपणानें टाकलेली आहे! विलायती मोटारींतून मिरविणारे आणि नाचरंगतमाशांत दंग होणारे आमचे बेपारी भाई इकडे लक्ष देतील काय? ' जय गोपाळ!—' म्हणून एकमेकाना नमस्कार करून कामाला लागणारे शेटजी त्या ' गोपाळजी 'ची एवढी गोपालनाची इच्छा पुरी करतील काय? असो.

---

## नक्षत्र ११ वें.

# कौटुंबिक, सामाजिक व राष्ट्रीय कर्तव्यें (पुढें चालूं)

आतां राजकीय प्रश्नात खालील गोष्टींचा आपणास विचार करावा लागेल. त्या अशा:—(१) स्वदेशी–बहिष्कार. (२) राष्ट्रीय शिक्षण. (३) निर्वासिताचा प्रश्न. (४) ग्रामसघटना. (५) साक्षरता प्रसार. (६) व भाषावार प्रांतरचना. तरी आतां प्रत्येकाचा थोडक्यात विचार करू. कारण मी मागेंच म्हटल्याप्रमाणें हे व यासारखें प्रश्नच इतके मोठे व व्यापक आहेत कीं, त्या प्रत्येकावर एकेक स्वतंत्र ग्रथहि लिहिता येईल. उदाहरणार्थ, रा. फाटकांची ' स्वदेशीची मीमासा ' हें अत्यंत उद्बोधक पुस्तक, अथवा ' संस्थानी स्वराज्या 'ची चळवळ चालू असतां त्यावरील सागलीच्या कै. रा. अभ्यंकराची केसरींत मागें येऊन गेलेली अत्यत चटकदार लेखमाला पहा. पण अशाप्रकारच्या बिस्तृत लेखमाला व ग्रथ लिहिण्याचा माझा अधिकार नाहीं, व प्रस्तुत पुस्तकाच्या विषयात व क्षेत्रमर्यादेंत आपणास तसें करताहि येणार नाहीं, हेंच याचें उत्तर असल्यामुळें, प्रत्येक विषयासंबंधीं आपण थोडक्यात पण कामापुरता विचार करूं, म्हणजे झालें!

पैकीं पहिली गोष्ट म्हणजे स्वदेशी–बहिष्काराची! स्वदेशीचें व्रत-पालन व परकी मालावर बहिष्कार घालण्याच्या ह्या दुधारी हत्याराचा, ह्या दुहेरी पट्ट्याचा उपयोग करून आपण मिळविलेलें स्वातंत्र्य चिरकाल टिकण्यास झटलें पाहिजे, हें उघड आहे! पण बहुजनसमाजाची आणि श्रीमंत धनिकांची वृत्ति त्या कामीं अद्याप व्हावी तशी तयार झालेली दिसत नाहीं, आणि त्याचमुळें स्वदेशाभिमानाचा खडखडाटच बहुतेक आपणांस आपल्या देशांत दृष्टीस पडत आहे! नाहीं तर, विलायती मालाची होळी केवळ हुलडीखातर १९०८ सालीं करावयास निघालेल्या आम्हींच,

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर अद्याप आपल्या स्वदेशाभिमानाच्या होळींत विलायती वस्त्रादिकांच्या वासना जाळायचें सोडून, त्या विलायती वस्त्रादिकांच्या खरेदीनें स्वदेशाला मात्र आग लावींत सुटावें, आणि अजून त्याच्या खऱ्या उद्धाराचा विचार आमच्या डोक्यात येऊ नये,—अगदीं सुशिक्षित म्हणविणाराच्या डोक्यांतहि येऊं नये,—याचा अर्थ काय? नसत्या चैनीची चटक स्वतःला लावून घेऊन त्यापायीं स्वदेशाभिमानाला बळी देणाऱ्या महामूर्खांच्या अकलेची किती तारीफ करावी बरें? हरहर! प्रभो, ह्या स्वदेशाभिमानाची ज्योत तू कधीं आमच्या मनात पेटविणार? सद्गृहस्थहो, हा प्रश्न केवळ श्रीमंत धनिकाचा नसून तुमचा, आमचा, सर्वांचा आहे!—देशातील प्रत्येक कुटुंबाचा—त्यातील प्रमुख नेत्यांचा हा प्रश्न आहे, हें विसरून कसें चालेल? अरे, तुमचा तो पूर्वीचा स्वदेशाभिमान कुठें गेला? शिवाजीबाजींना विसरलात काय? चिपळूणकर, टिळक, काका जोशी, महात्मा गांधी, यांचा विसर पडला काय? त्यांची चरित्रें वाचताना माना डोलविता, देशभक्तीनीं भरलेलीं व्याख्यानें ऐकून टाळया पिटता, मेळ्यातील मुलामुलींचीं देशभक्तिपर पदें ऐकून त्यांची वाहवा करता आणि पुन्हा आपलें विलायती वस्त्रानें मिरवायला आणि हातात विलायती सिगारेटचीं थोटकें धरायला तुम्हाला शरम कशी रे वाटत नाहीं? जवळ पांचपंचवीस हजारांची पुंजी झाल्याबरोबर फटफटी किंवा फोर्डकार घेऊन जिवाची चैन करूं पाहणाऱ्या जीवांनो, मोठ्या ऐटीनें त्यातून मिरवताना आपण विलायतच्या जिवावर हे जगत आहोंत नि मिरवीत आहोंत, ह्या विचाराच्या शरमेनें तुमची मान खालीं कशी जात नाहीं? आपल्या मायबहिणींची अब्रू घेणाऱ्या व त्याना गुलामाप्रमाणें वागवणाऱ्या विलायती मळेवाल्याच्या मळ्यांतील चहा पिण्याची चटक आपण जडवून घेण्याची काडीची तरी जरूर होती काय? पण इतका विचार करावा कुणी? विचाराची आणि आमची मुदली मुळांतच फारकत झालेली! मग तो आमच्या डोक्यांत येतोच कशाला? मेंढरांच्या सारखी

आमची गत, आणि उच्च भावनाहीन आमचें जीवन! पण ही स्थिति आता तरी आपण बदलायला नको काय? मग ह्या मोहनिद्रेतून आपण केव्हां बरें जागे होणार? उठा! उठा! जागे व्हा!–ही पहा आपली भारत-माता तुम्हास अत्यत कळवळ्यानें हाक मारून सांगत आहे कीं, "बाळांनो, स्वदेशी आणि बहिष्कार ही दुधारी तरवार हातीं घ्या, हा दुहेरी पट्टा चढवा आणि निश्चयाच्या वारूवर स्वार होऊन त्या दुहेरी पट्टयाच्या फेकीनें आपल्या स्वातंत्र्याचें रक्षण करा!"

पैकीं पहिल्या पट्टयाची फेक कशी करावी, चहा, सिगार, साखर, साबण, कापड, व वाहनें इत्यादि सर्व बाबतींत आपण विलायती मालावर कडकडीत बहिष्कार घालून स्वदेशीचें–आणि तेंहि शक्यतों निर्भेळ स्वदेशीचे व्रतच आपण कसें पाळावें, स्वदेशाभिमानाच्या वाऱ्यानें भारून जाऊन भीमशक्तीच्या थरारीनें हीं कामें आपण कशीं उरकावीत, हे मी वर सांगितलेंच आहे! त्याकामीं आपण मुख्य गोष्ट लक्षात ठेवायची म्हणजे स्वदेशीचा विचार! स्वदेश, स्वधर्म, स्वसमाज, आणि परमार्थ ह्या चार गोष्टींच्या वातीनें प्रज्वलित झालेली समई–समयीं उपयोगी पडणारी ही उज्वल तेजाची ठाणवई–आपल्या अंतःकरणात सदैव जळत असली पाहिजे व तिच्या प्रकाशातच आपण आपला मार्ग चोखळला पाहिजे! पण हा विचाराचा दिवा–हा 'अंतरिचा ज्ञानदिवा'च जर आपण मालवून टाकला तर–तर मग काय? अंधःकाराचें–भीषण आणि भयाण अंधःकाराचेंच साम्राज्य त्याठिकाणीं माजणार, व त्या अंधारांत परकीय चोर आपणास मनमुराद लुटणार हें उघड आहे!–ते लुटल्याशिवाय राहाणार नाहीत–राहणें शक्य नाही! आजवर त्यांनीं आपणास मनमुराद लुटलेंच आहे, व आपण अजूनहि सावध न झाल्यास यापुढेहि ते आपणास असेंच लुटीत राहतील हें निःसंशय आहे! पण याकामीं दुसऱ्यास नांवें ठेवण्यात आणि दुसऱ्याच्या नावानें बोटे मोडण्यात काय अर्थ, आणि काय हशील आहे? या जगांत सुखदुःखाचे देते घेते आपले आपणच आहोंत, हें

लक्षांत ठेवलें पाहिजे! विलायती मालाच्या मोहकमायेचा घटोत्कची बाजार त्यांनीं थाटला तरी त्याच्या बाह्य भुलभुलावणीला भुलून आपणच आपली फजगत करून घेत असतों ना! विचार न करतां वाटेल त्या दुकानांत शिरून, स्वदेशी विदेशीची वास्तपुस्तहि न करतां, आपणांस हवा तो माल घेणारीं माणसें ह्या स्वातंत्र्योत्तर कालांत—१९५० सालांतहि इतकीं पुष्कळ दिसावींत, ही किती दुःखाची गोष्ट आहे बरें! समर्थांनीं या 'सावधपणा'-विषयीं—विचार आणि विवेक ह्या जोडगोळीविषयीं—जागोजाग जें एवढें प्रतिपादन केलें आहे, जागोजागीं लोकांनीं जागृत राहावें म्हणून एखाद्या जागल्याप्रमाणें "सावध, हुशियार" म्हणून जी गस्त घालून आरोळी ठोकलेली आहे, तिचें तरी कारण हेंच कीं, बहुजनसमाज हा असा आघळा असतो! त्याला स्वदेश, स्वधर्मादि वर सांगितलेल्या चार गोष्टींच्या बाबतींत सावध करावे तितकें थोडेंच असतें! आम्ही उद्देशिलेली "जीवितोद्धार ग्रंथमाला" व तिचीं आजवर निघालेलीं दोन पुस्तकें, तसेंच प्रस्तुत पुस्तक, व यापुढेंहि लिहिलीं जाणारीं पुस्तकें, किंबहुना, आजवर आमचे हातून झालेलें व यापुढेंहि होणारें सर्व लिखाण, हें त्याचाच एक अल्पसा यत्न आहे! असो.

तर सांगण्याचा भाग असा कीं, बाबानो, सद्गृहस्थहो, यापुढें तरी असें अविवेकीपणानें न वागतां आपणास लागणारा कोणचाहि माल विकत घेण्यापूर्वीं आधीं स्वदेशाचा विचार करा, आपल्या भारतमातेची महन्मंगल मूर्ति तुमच्या डोळ्यापुढें उभी राहूं द्या व "माते, मी तुझ्याशीं बेइमान होणार नाहीं, हराम होणार नाहीं, वंदेमातरम्!—" असें म्हणून व तिला भक्तिभावानें वंदन करून मगच पुढें खरेदीला जा, म्हणजे स्वदेशी मिळत असणारा मालहि विदेशीच घेण्याचें पाप—महापाप—तुमच्या हातून होणार नाहीं!—यापेक्षा अधिक काय सांगूं! ही वागणूक विचारापेक्षांहि भावनेची आहे हें लक्षांत ठेवा, आणि कोण किती नफा मारतो, आणि निष्प्रतिबंध व्यापार चांगला कां प्रतिबंधक व्यापार चांगला, वगैरे विचा-

राच्या कल्लोळात तुम्ही बुडून जाऊ नका; त्या वादाचें वारि वारंवार तुमच्या आवर्तीभोवतीं उसळत असलें, तरी तुम्ही आपल्या भावनेचें मस्तक त्या वारीच्या वर, अगदीं वरच्यावरच राखा, तरच तुमची त्यांत बखगत लागेल व तुम्ही सुखरूपपणें पैलतीर गाठाल!—ह्यापेक्षा अधिक काय सांगूं? कारण, या आकड्याच्या गौडबंगालात प्रत्यक्ष 'प्रधाना'सारखी माणसेंहि कशीं फसगत पावलीं होतीं, तें मी मागें सांगितलेंच आहे! असो.

पण याप्रमाणें वागायचें म्हटलें, तरीहि अशा कांहीं अपरिहार्य गोष्टी निघतीलच कीं,ज्या आपल्या जीवनात अत्यंत आवश्यक असून ज्या स्वदेशीं मिळत नाहींत. स्वातंत्र्यासाठीं कारावास स्वीकारणाऱ्या आणि स्वातंत्र्याचें दिव्य संगीत गात रणांगणावर देह ठेवणाऱ्या देशगौरव सुभाषबाबूंच्या दृष्टिपथातूनहि 'महाराष्ट्र प्रांतिक परिषदे'च्या अध्यक्षस्थानावरून पंचवीस वर्षांपूर्वी भाषण करताना हें व्यावहारिक सत्य सुटलेलें नव्हतें! यासाठीं अशा लागणाऱ्या ज्या वस्तू असतील त्यांच्या खरेदीच्या वेळींच हा बहिष्काराचा विचार प्रामुख्यानें आणि जोरानें पुढें येतो! वास्तविक, बहिष्कार या शब्दाचा अर्थ बाहेर टाकणें, आत न घेणे, उपयोग न करणें, न वापरणें असा असून तो इंग्लंडप्रमाणेंच इतरहि सर्व परदेशी मालाला तितकाच लागूं आहे! कारण, आपण वर्तमानपत्राचें जर सूक्ष्म वाचन ठेवलें असेल तर आपणास ही गोष्ट तेव्हाच लक्षात आली असेल कीं, महायुद्धांत किंवा त्याच्या आगेमागें एकमेकाला क्रूर, दुष्ट, आणि संस्कृतिहीन समजणारीं इंग्लंड. फ्रान्स, जर्मनी, अमेरिका, इत्यादि सर्व पाश्चात्य राष्ट्रें व त्यांच्याच जोडीस जाऊन बसलेले जपान,—हीं सर्व राष्ट्रें वास्तविक क्रौर्य, दुष्टपणा, आणि संस्कृतिहीनता या बाबतींत अगदीं 'एकाच माळेचे' हमखास 'मणी' होते! असो. तर सांगण्याचा भाग असा कीं, याप्रमाणें स्वदेशीचें व्रतातच बाकीच्या सर्व विदेशी मालाच्या बहिष्काराचा अंतर्भाव होतोच आहे! आणि त्या अर्थानेंच पाहिल्यास स्वदेशीचें महात्म्य गाइल्यावर बहिष्काराचें वर्णन वेगळें नकोच आहे! कारण, मी "खरेंच बोलेन"

अशी शपथ घेतल्यावर "खोटें बोलणार नाहीं" हें वास्तविक वेगळें सांगण्याची बिलकुल जरूर नसावी, आणि ती नाहींहि! तरीपण 'हलवून खुंटा बळकट करण्यासाठीं' म्हणून तें सांगून, त्याच्याहि पुढची पायरी म्हणजे, स्वातंत्र्यवीर सावरकरांनीं सांगितल्याप्रमाणें, चढाईची स्वदेशी हीच खरी स्वदेशी होय, असें जें श्री.द.वा.बर्वे यांनीं दि. १५-३-५० च्या येथील टिळक स्मारक मंदिरांतील सभेंत सांगितलें,तीच होय! तरी त्याचाहि विचार स्वतंत्र हिंदुस्थानांतील तरुणांनीं अवश्य केला पाहिजे!

तथापि, ह्या चढाईच्या स्वदेशीचा उपदेश आजवर परदेशी मालाचे प्रचारक जे लोक होते त्यांनाच उद्देशून असून, इतर लहानथोर लोकांनीं स्वदेशीचें व्रत स्वातंत्र्योत्तर काळांतहि चालविणं कसें जरूर आहे, यासंबंधीं खुद्द कॉंग्रेस सरकारच्या दोन थोर पुढारी अधिकाऱ्यांचे उद्‌गार येथें दिले असतां आमच्या वाचकास पुरेपूर कळून येणार आहे.

पैकीं,पहिले भाषण "अखिल भारतीय उद्योग प्रदर्शना"चे उद्‌घाटन करतांना भारताचे उपपंतप्रधान सरदार वल्लभभाई पटेल यांचे होय! दि. ३०-१-५०च्या दै. प्रभात मध्ये त्याचा वृत्तांत आला असून सदरप्रसंगीं सरदार पटेल म्हणाले कीं, "प्रत्येक हिंदी नागरिकानें 'हिंदुस्थानमें बनेहो माल'च खरेदी केला पाहिजे, परदेशातला करता कामा नये; एवढेंच नव्हे तर, त्या परदेशी मालाला स्पर्शहि करू नये! परदेशात हेंच तत्व शिकविले जाते! ब्रिटनमध्यें तर "Buy British goods" ह्या मंत्राचें लहान मुलांना बाळकडूच दिलें जाते." असो.

दुसरें भाषण मुंबई सरकारचे अर्थमंत्री श्री. वैकुंठभाई मेहता यांचे साताऱ्याच्या 'स्वदेशी कमर्शिअल कंपनी'च्या श्री. चिरमुले यांच्या थोर कार्याचा गौरव करतांना झालेलें असून, त्याचा वृत्तांत 'दैनिक भारत'मध्यें दि. २४-४-५०च्या अंकांत आला आहे. सदर प्रसंगीं श्री. वैकुंठभाई म्हणाले:—"आपल्या लोकांनी स्वातंत्र्याच्या संग्रामात स्वीकारलेलें स्वदे-

शीचें व्रत गेलीं ७–८ वर्षे सोडून दिल्याचें दिसतें. परतु तें चूक आहे. आर्थिक व सांस्कृतिकदृष्टया स्वदेशीव्रताचा स्वीकार आपल्या स्वदेशाच्या उत्कर्षासाठीं स्वातंत्र्योत्तर कालातहि पुन्हा करणें जरूर आहे!" असे.

वरील थोर पुढाऱ्याच्या उद्‌गारावरून स्वदेशीचें महत्व आतां तरी आमच्या वाचकास पटेल, अशी आम्हांस आशा आहे.

अर्थात् स्वदेशी आणि बहिष्कार हीं दोन्ही एकाच तरवारीचीं दुधारी पातीं आहेत, व त्यातल्या कोणत्याहि पात्याचा घाव परक्याच्या वर्मी बसत असतो, हें लक्षात ठेवलें पाहिजे! यासाठीं सर्व सद्‌गृहस्थ बाधवाना, माझ्या सर्व गृहस्थमित्राना आणि देशबंधूंना, मला हेंच सांगा-यचें आहे–अगदीं पुनःपुन्हा हेंच सागायचें आहे की, बाबानों, उठा, त्वरा करा, आणि हा दुहेरी पट्टा हातात चढवून, आणि आपल्या शूर पूर्वजाचे स्मरण करून, एकदम त्याच्या फेकीला आणि सफाईचे हात करण्याला सुरवात करा पाहूं? तसे कराल, तरच तुमचा तरणोपाय आहे! नाहीं तर पुनश्च परक्याच्या गुलामगिरींत कायमचेंच प्रेतवत् पडून राहावें लागेल! स्वामी रामतीर्थ काय म्हणतात तें ऐकलेंत का? तेहि म्हणतात, "जागे व्हा, उठा, नाहीं तर कायमचे प्रेतवत् पडून रहा! (Awake! Arise! or be fallen for ever!) असा निसर्गाचा निर्घृण कायदा आहे! या कायद्यास जो वेळींच मान्य तुकवील तो जगेल! तिकडे दुर्लक्ष करील तो मरून जाईल!" वाचक! ऐकलेत ना स्वामीजींचे घनगभीर शब्द? मग लागा पाहू आता त्या उद्योगाला? ह्याच उद्योगाच्या जोरावर "वंगभग"ची मग्रूर भाषा बोलणाऱ्या भगड कर्झनची दर्पोक्ति फोल ठरली व "वंगभंग"चा एवढा चग बाधला असताहि तो "भग"च शेवटीं भगला–उलथून पडला–हें विसरू नका! त्याच स्फूर्तिदायक इतिहासाचें पान करून, आतां स्वातंत्र्योत्तर कालातहि त्याच्या शतपटच नव्हे, तर सहस्रपट उत्साहानें तुम्हाला तयारीला लागलें पाहिजे! कारण ती चळवळ प्रांतिक होती, पण

ही चळवळ सार्वदेशिक आहे ! आणि परकीयाच्या परवशतेचा पाश पुन्हा तागडीच्या रूपाने आपल्या गळयाला लागूं नये अशी इच्छा असेल तर त्या ' विषवृक्षा 'चें बीजच आपल्या मायभूमींत पुन्हा रुजणार नाहीं अशी आपण काळजी घेतली पाहिजे, व सतत जागृत राहून हे कार्य केले पाहिजे ! अर्थात्, कोणच्याहि निमित्ताच्या उठलेल्या लाटेचा जरी फायदा घेण्याची तयारी आपण केली, तरी पण ती लाट ओसरल्यावर त्या लाटे-बरोबरच आपला उत्साहहि ओसरत असतो, म्हणून त्या कामीं शाश्वत तत्वासाठीं व त्या त्या विषयाच्या केवळ निर्हेतुक प्रेमाखातरच कोणचाहि झगडा चालवावा, आणि तसा तो चालविला तरच तो शाश्वत टिकतो व शाश्वत सुखाला कारणी-भूत होतो, अशा मताचा मी मनुष्य असल्यामुळें, केवळ स्वदेशप्रेमाखातर आणि स्वातंत्र्याच्या रक्षणार्थ तुम्ही हा झगडा चालवावा, असें माझें तुम्हां सर्वांना सांगणें आहे ! कारण, मागें " वंगभंग " रद्द झाला म्हणून देशाचा " मानभंग " इतर रीतीनें किमपि तरी कमी झाला होता काय ? मग ही स्वदेशीची उसळती लाट अधिकाधिक जोमानें वरती चढायची आणि पुढें सरायची ते जाऊन अशी लगेच का बरें दबली—ओसरली—नाहींशीं झाली ? तर त्याचे कारण हेंच कीं, शरीरावरील एके ठिकाणीं झालेलें बेंड बरें करण्यास लावलेली ती मलमपट्टी होती ! त्या पट्टीने बेंड बरें झाल्यावर वैद्यकीय ज्ञानाचें व आरोग्यशास्त्राचें अज्ञान असलेला जीव जसा स्वस्थ बसतो तसेंच येथें झालें, नव्हे, आजवरच्या बहुतेक चळवळी अशाच स्वरूपाच्या—अशाच हुल्लडीच्या झाल्या ! पाण्यावर मारलेल्या काठीनें उठणाऱ्या त्या लहरी लाटा होत्या ! आंतरिक चेतनेनें उद्भवणारे हृदयखळवळीचे ते तरंग नव्हते ! म्हणूनच त्या आजवर वेळोवेळीं जागचेजागीं निमाल्या, इतकेंच नव्हे, तर त्याच्या उलटहि दृश्यें किती तरी ठिकाणीं दिसू लागलीं ! यासाठीं, असा भीषण देखावा पुन्हा दिसू नये म्हणून, खऱ्या हृदयाची फुरफुरच तुम्ही फुरवा, हेंच माझें सर्वांना पुनः पुन्हा सांगणें आहे ! असो.

---

नक्षत्र १२ वें

## कौटुंबिक, सामाजिक व राष्ट्रीय कर्तव्यें ! ( पुढें चालू )

आता पुढचा प्रश्न राष्ट्रीय शिक्षणाचा ! १९२२ सालापासून ठिक-ठिकाणच्या " राष्ट्रीय शाळा "तून तयार झालेल्या तरुणानीं अलोट स्वार्थ-त्यागानें व दुर्दम्य देशभक्तीने १९४२ पर्यंत अनत्याचारी सत्याग्रहानें व १९४२ सालच्या महात्मा गांधींच्या " चले जाव " चळवळींत क्वचित् अत्याचारी व भूमिगत चळवळीनें परकी सरकारला हैराण करून सोडिलें व अखेर स्वातंत्र्याचें फळ पदरात टाकण्यास त्यास जवळ जवळ भाग पाडिलें यात शंका नाहीं ! पण सदर शिक्षणाचे पोटीं " अखिल हिंदु-विजयध्वज हा उभवु या पुन्हा ! ध्वज हा, उभवु या पुन्हा ! " ही स्वातंत्र्यवीर सावरकरांची शिकवण नसून " तिरंगी झेंड्या"ची तिरंगी शिकवण असल्यामुळें, व त्यातच " हिंदुमुस्लिम ऐक्याशिवाय स्वातंत्र्य मिळणें अशक्य ! "—ह्या न्यूनगंडात्मक शिकवणीचा अतिरेक झाल्यामुळें, कॉंग्रेसी पुढाऱ्यांचीसुद्धा मुस्लिमधार्जिणी वृत्ति बनून, अखेर पाकिस्तानच्या रूपानें त्याचीं अत्यंत कटु फळे चाखण्याचा प्रसंग आपल्या प्रिय मातृ-भूमीवर येऊन ठेपला असूनहि अद्याप ही वृत्ति निःशेष लुप्त होऊ नये हें पाहिल्यावर अथवा हें पाहून, कोणाहि खऱ्या मायभूमीच्या हितचिंतकाचा ऊर भरून आल्यावाचून राहणार नाहीं !

अशा स्थितींत, स्वराज्यसंपादनार्थ स्वातंत्र्य वीर सावरकरानीं ज्याप्रमाणें हिंदुमहासभेच्या अध्यक्षपदावरून व ठायींठायींच्या दौऱ्यातून सहा वर्षें, " याल तर तुमच्यासह, न याल तर तुमच्यावाचून, आणि विरोधाल तर त्या विरोधाला उलथून पाडून हिंदु लोक आपलें हिंदु-स्थानचें स्वराज्य मिळवितीलच मिळवितील ! " हा मृत हाडानाहि चैतन्य देणारा बीजमंत्र सांगितला, इतकेंच नव्हे, तर महात्माजींच्या शोचनीय

वधाच्या खटल्यातून निष्कलंक बाहेर पडल्यावर, त्याचें जें आसेतुहिमाचल स्वागत झालें, त्यात कलकत्त्याला अफाट जनसमुदायांतील "एक धक्का और दो, पाकिस्तान तोड दो!" ही घोषणा आपल्याला फार सुंदर वाटली म्हणून जे त्यांनीं सांगितलें, त्यात जी हिंदूंच्या उन्नत्यर्थ तळमळीची तीव्र जाणीव प्रगट झाली, तीच जाणीव सर्व हिंदुमात्रांनीं हृदयाशीं बाळगली पाहिजे, तरच हिंदूंचा व हिंदुस्थानचा खराखुरा उद्धार होणार आहे, व हीच शिकवण आमच्या गृहस्थवाचकांनीं आपल्या मुलामुलींच्या मनावर ठसविली पाहिजे, व हीच चालू काळच्या 'राष्ट्रीय शिक्षणां'तील पहिली गोष्ट होय! तरी याचा अवश्य विचार आमच्या गृहस्थवाचकांनीं करावा, यापेक्षा मी तरी दुसरें काय सांगणार?

पूर्वींच्या 'राष्ट्रीय शिक्षणा'तील आमच्यामतें असणारें पहिलें व्यंग अथवा चूक याप्रमाणे दाखवून दिल्यावर आता दुसऱ्या चुकीकडे मला वळावयाचें आहे, व ती चूक वरील चुकीपेक्षाहि मोठ्या स्वरूपाची आहे; ती म्हणजे, धर्म आणि संस्कृति यांच्या शिक्षणाची आबाळ—हयगय—किंबहुना, अभाव, असेंहि म्हणता येईल! याच शिक्षणाचे अभावीं, खरेंखुरें शिक्षण न मिळाल्यामुळेंच, 'सत्या'च्या नावाखालीं असत्याचा बाजार आज सर्वत्र भरला असून अधिकार, प्रतिष्ठा व द्रव्यलोभ यांच्या हिडिस लालुचीनें लालचावलेलें लहानमोठे पुढारी, अधिकारी, कारखानदार, बेपारी, व सुखवस्तु श्रीमान लोक किती अध:पतित झाले आहेत ह्याचें प्रतिदिनींचीं वर्तमानपत्रें, साप्ताहिकें व मासिकें यातून येणाऱ्या विचारवंतांच्या लेखांवरून व प्रत्यक्ष अनुभवानेंहि सामान्य अशा गरीब व दीनदुबळ्या जनतेला अनुभव येतोच आहे! तेव्हा त्याचें पुन्हा वेगळें वर्णन कशाला पाहिजे? यासाठीं, आपली भावी पिढी तरी केवळ 'पायघोळ संत' बनणार नाहीं, तर खरीखुरी सत्याची चाड बाळगणारी बनेल, याची खबरदारी आमच्या गृहस्थवाचकांनीं आतांपासूनच घ्यायला पाहिजे, तरच आपलें राष्ट्र विनाशापासून वाचेल, यापेक्षा जास्त काय

सांगावें ? कारण, देव, धर्म, संस्कृति ह्या गोष्टींचें रक्षण आपलें आपण प्रत्यक्ष आचरणांत करून दाखविलें तरच होणार आहे, व याच अर्थानें "धर्मो रक्षति रक्षितः" हें वचन लिहिलें गेलें आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे ! नाहींतर इकडे "सत्यनारायण" करावयाचें, व तिकडे "असत्याचरण" धडाकून चालूच ठेवावयाचें, हा देखावा आपण सर्वत्र पाहतोंच आहोत ! पण तो केवळ 'देखावा'च आहे, व अशा देखाव्यानें खरीं कार्यें—मग तीं आत्मोन्नतीचीं असोत, समाजोन्नतीचीं असोत, किंवा, राष्ट्रोन्नतीचीं असोत,—कधींच यशाप्रत पावत नाहींत, हें विसरता कामा नये ! पण "खाना, पीना, मजा उडाना !" व "भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमन कुतः ?" ह्या चार्वाकाच्या भगड वृत्तीचीच पकड आज लहानापासून थोरापर्यंत बहुतेकांच्या मनावर बसलेली पाहून, खरोखरी विचारी जीवाचें मन किती विपण्ण होत असेल बरें ! कै. साने गुरुजी-सारखें अत्यंत तळमळीचे व काव्यात्म जीव ह्या वृत्तीच्या थैमानाच्या दर्शनानेच विटून जाऊन झोपेच्या औषधाचा डोस जास्त घेऊन या जगातून निघून गेल्याचें पाहूनहि अजून आपण सावध न झाल्यास 'आपल्यासारखे शहाणे आपणच' म्हणावें लागेल ! असो.

याशिवाय चालू काळच्या 'राष्ट्रीय शिक्षणा'त आपणास आपल्या मुलाबाळांना, त्यांचें शालेय व महाविद्यालयीन शिक्षण चालू असतांना, देशांत असणाऱ्या विविध राजकीय पक्षांची योग्य ती जाणीव करून देऊन, त्यांच्या विचारसरणींतलें दोष दाखवून, त्यांचीं मनें आपल्या मतें योग्य असणाऱ्या पक्षाकडेच वळविण्याची शिकस्त केली पाहिजे ! कारण, आतां लोकशाहीचा अमल सुरू झाला असून, त्याकामीं राज्यघटनेच्या आराखड्यांतील व नियमावलींतील वचनें चांगलीं असलीं, तरी मध्यवर्ती नि प्रांतिक सरकारकडून केल्या जाणाऱ्या विविध कायद्यांतील योग्य कोणते व अयोग्य कोणते, न्याय्य कोणते नि अन्याय्य कोणते, खरें स्वातंत्र्य—मूलभूत स्वातंत्र्य—देणारे कोणते, व 'हम् करे सो कायदा !' असें दडपशाहीचे कायदे कोणते, ह्याची

जाणीव नि ओळख आपण आपल्या सुजाण मुलामुलींना अवश्य करून दिली पाहिजे! व तशी दिली तरच भावी पिढीचे हे नागरिक देशाला सुमार्ग दाखविणारे प्रतिनिधी निवडून देतील, अथवा, स्वतः अधिकारावर आल्यावर योग्य नि चांगल्या प्रकारें वागतील,हें उघड आहे!'मनस्येकं वचस्येक' अशी वागणूक खुद्द पंत प्रधानापासून कशी आजकाल सुरू आहे याचा अगदीं ताजा पुरावा म्हणजे 'प्रतिबंधक स्थानबद्धतेचा कायदा'—पूर्वीच्या 'भारत संरक्षण कायद्या'-लाहि खाली पहावयास लावणारा, व इंग्रजी अमलहि यापेक्षा अधिक सुखावह होता असें म्हणावयास लावणारा काळा कायदा होय! कोणतेंहि कारण नसता, हा कायदा पास करून घेऊन, त्यायोगें आपल्याला अप्रिय असणाऱ्या थोर थोर अशा अन्यपक्षीय लोकांना, विनाचौकशी तुरुगात घालणाऱ्या सरकारच्या ह्या कायद्याकडे पाहिलें म्हणजे, हल्लींचें राज्य हें 'स्वराज्य' असलें तरी 'सुराज्य' खास नव्हे, व अशा रीतीनें राज्य करणारांना अधिकारावर राहण्याचा तिळमात्रहि अधिकार नाहीं, हें 'विसरभोळ्यासाठीं स्मरणगाठी' देणाऱ्या 'केसरी'त ॲडव्होकेट सुशील एस्. कवळेकर यानीं, खुद्द महामंत्रि पंडित जवाहरलाल नेहरूचेच उद्गार दि. १३—६—५०च्या केसरींत, आपल्या लेखमालेच्या शेवटच्या लेखाचे शेवटीं दिलेले आहेत, तेवढे वाचकाना सादर करतों म्हणजे झालें! ऐका, ब्रिटिश राज्यकर्त्यांबद्दल पंडितजींनीं १९३६मध्यें कॉंग्रेसच्या व्यासपीठावरून काढलेले उद्गार ऐका:—

'A Government that has to rely on the Criminal Law Amendment Act and similar laws, that suppresses the Press and Literature, that bans hundreds of organizations, that keeps people in prison without trial,......is a Government that has ceased to have even a shadow of justification of its existance!'

सद्गृहस्थहो, ब्रिटिश सरकाला एक न्याय लागूं व आपणांला दुसरा न्याय लागू, असें तर सध्यांच्या सरकारचे मत नाहीं ना? तसें नसेल, तर वरील विसंगतीचा उलगडा काय? असो.

यानतरचा प्रश्न म्हणजे निर्वासिताचा प्रश्न होय! वास्तविक, वर सांगितलेले मुस्लिमधार्जिण्यावृत्तीचे व्यंग जर आमच्या स्वराज्यसपादनपूर्वकालात आमच्या "राष्ट्रीयशिक्षणा" त पुढाऱ्याच्या मनात राहिले नसते, तर हा प्रश्नच उत्पन्न होण्याचें कारण नव्हते! परतु स्वराज्यसपादनाचें कामीं, म्हणजे त्याचें फळ आपल्या पदरात पाडून घ्यायला, आमचे पुढारी इतके उतावीळ झाले होते कीं, "उतावळा नवरा अन् गुडघ्याला बाशिग!" ह्या म्हणींतील 'उतावळया नवऱ्या' प्रमाणेच त्यांची अक्षरशः स्थिति होऊन, आपण ज्यांच्या मताच्या जोरावर निवडून आलों व पुढारी म्हणून मिरवलों, त्याना निवडणुकीच्या वेळीं १९४५ मध्ये आपण "अखड भारत" राखण्याची दिलेली आश्वासनेंहि ते विसरून गेले, व स्वराज्यसुदरीशीं लग्न करण्याच्या घाईत, पाकिस्तानसकट स्वराज्याचा स्वीकार करताना जनतेचा कौल घेण्याची कल्पना गव्हर्नर जनरलने सुचविली असताहि, काहींतरी उडवा-उडवीचीं उत्तरें देऊन ती कल्पना त्यांनी बाजूस सारली, व जनतेला दिलेली आश्वासने म्हणजे निव्वळ व्याख्यानबाजींतल्या थापा ठरून, जनतेचा विश्वासघात करूनच हे कार्य त्यांनीं साधलें असल्यामुळें, खरोखरी या सर्व अनर्थाला आमचे उतावीळ कॉंग्रेस पुढारीच सर्वस्वी कारण होत, असच, सर्व निःपक्षपाती लोकाप्रमाणे, आमचेंहि मत आहे!

बरें, पाकिस्तान मान्य करून कां होईना, म्हणजे देशाचें विभाजन करून, 'अखंड भारता'चें 'दुखड भारत' करून कां होईना, पण त्याच-वेळीं पाकिस्तानचे कायदेआझम जिन्हा व हिंदुस्थानचे घटनातज्ज्ञ डॉ. भीमराव आंबेडकर यांनी—या दोघांनींहि—इशारा दिला असतांहि, प्रथम लोकसख्येची अदलाबदल करण्याचें अत्यत महत्त्वाचें काम सोडून देऊन, केवळ उच्च कल्पनाकाशांत तरगणारे आमचे पुढारी खुशाल स्वराज्य-सपादनाचा उत्सव करण्यांत दंग झाले! परतु, त्याच वेळीं तिकडे पाकि-स्तानांत—पश्चिम पाकिस्तानांत—हिंदूंच्या हकालपट्टीचा केवढा हल्लकल्लोळ

जायला होता वरें ? परंतु तो तसाच दुर्लक्षांत बुडवून आमचे पुढारी स्वस्थ बसले ! वास्तविक, जिनानीं पाकिस्तान संपादनाच्या आधीं 'डायरेक्ट ॲक्शन'ची धमकी देऊन, तदनुसार त्याच्या अनुयायानीं कलकत्त्यात व नोआखालींत अनेक भीषण अत्याचारहि केले होते! त्यावरून तरी योग्य तो बोध आमच्या कॉंग्रेसी पुढाऱ्यानीं घ्यावयास नको होता काय ? बरें, तेव्हा घेतला नाहीं, पण खुद्द पाकिस्तानाचें उदक जिनाच्या हातावर सोडताना तरी,—जिनाच्या सूचनेचें एक राहो, पण खुद्द आंबेडकराच्या—म्हणजे स्वदेश-बांधवाच्या कळकळीच्या सूचनेकडेहि दुर्लक्ष करून "मुरारेस्तृतीयःपन्थाः" याप्रमाणें आमच्या सरकारानीं तृतीय पथ स्वीकारून ही भयंकर आपत्ति शेवटीं स्वतःवर ओढवून घ्यावी, व मागाहून "आम्हास कल्पना नव्हती असें काहीं होईल म्हणून !" अशा कबुल्या देत सुटावें, यात काय शहाण-पणा ! तुम्हाला कल्पना नव्हती, पण तुमच्याच देशबंधूनीं तुम्हास ती दिली होती ना ? मग तिकडे दुर्लक्ष का केलेंत ? फार काय, पण खुद्द पंडित जवाहरलालाना पश्चिम पंजाबच्या निर्वासिताच्या वाहत्या लोंढ्यातील एका वृद्ध स्त्रीनें हाच सवाल टाकून निरुत्तर केल्याचे 'केसरी'तील एका 'धावत्या दृष्टिक्षेपा'त जें त्यावेळीं लिहून आलें होतें, त्यावरूनहि "सर्वतंत्रस्वतंत्र" अशा आमच्या सरकारची विचित्र वागणूकच दिसून आली नाहीं काय ? असो.

पण तसें असलें तरी, सरकार शेवटीं आपलेंच आहे, व तें जरी पश्चिमपाकिस्तानातून हिंदूंची हकालपट्टी होताना, फार काय, पण पूर्व-पाकिस्तानातल्या हिंदूवरहि तीच भयानक आपत्ति नुकतीच ओढवली जात असतानाहि लवकर व पूर्ण सावध झालें नसलें, तरी त्याच्यापरीनें तेंहि हा प्रश्न सोडविण्याचा यत्न करीत आहे हे जाणून, त्याच्या हातून आजवर झालेल्या व पुढेंहि कदाचित् होणाऱ्या चुका जरी आपण निर्भीड-पणें त्यास सांगितल्या, तरी निर्वासिताना आसरा नि सहाय्य देण्याच्या त्याच्या प्रयत्नांत आपणहि आपणाकडून होईल ती मदत करणें, हे आपलें

आजचें 'राष्ट्रीय कर्तव्य'च होय! अर्थात् येथेंहि श्रीमंत धनिकांच्या दातृत्वाचा ओघच मुख्यत: उपयोगी पडणारा आहे, हें पुन्हा सागणें नकोच!

आता पुढचा प्रश्न ग्रामसंघटनाचा! या 'ग्रामसंघटना'कडे वळून पहाता या प्रश्नाचा आज आपणांस विचार करण्याची पाळी येत आहे, याचाच अर्थ ग्रामाची म्हणजेच खेडेगावाची स्थिति आज अत्यत हलाखीची होऊन, कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाहीं, अशी स्थिति झाली असली पाहिजे हें उघड आहे!–आणि ती तशीच झालेली आहे हें मी माझ्या "मुलाच्या मार्गदर्शका" मध्यें मुलाला खेडेगावाचें दर्शन देताना दाखविलेंच आहे! तेव्हां येथें त्याची पुनरुक्ति करीत नाहीं. वाचकांनीं कृपा करून तें तेथें पहावें, अशी विनंति आहे. साताऱ्चे रा. सोमण याचे अध्यक्षतेखालीं नगरचे रावबहादूर चितळे याचे 'वसंत व्याख्यानमालें'त याच विषयावर मागेंच व्याख्यान झालें होतें! शिवाय "खेड्यापाड्याची संघटना" ह्या पुस्तकावर अभिप्राय देताना 'केसरी'कारानींहि आपल्या ता. १५।५।२८ च्या अकात त्याचें वर्णन मोठें छान दिलें असून खेडेगावचें मूर्तिमत चित्र मोजक्या शब्दात वाचकापुढें माडले आहे! यासाठीं तेवढेच खालीं देतों, म्हणजे पूर्वीची–नुकत्याच सपलेल्या परकीय अमलातली–स्थिति कळून त्यावर उपाय काय तेंहि पण वाचकाना त्यातच कळणार आहे! 'केसरी'कार म्हणतात:—"आमचीं खेडीं इग्रजी राज्यापूर्वीं सुसंघटित होतीं. इग्रजाच्या सघटनेची कल्पना वेगळी व हिंदी लोकाच्या सघटनेची कल्पना वेगळी. हिंदुस्थानातील खेडीं राजकीय, सामाजिक, धार्मिक व औद्योगिक या चारहि बाबतींत स्वयंपूर्ण, संघटित व स्वावलंबी होतीं; परंतु इग्रजी राज्यात इलाखा, प्रात, जिल्हा, व तालुका या टप्प्यानीं राजकीय सत्ता खालीं उतरत येत असतां खेडेगांवापाशीं पूर्वीच्या राजकीय सत्तेचा अश फारच थोडा उरला. वरून हुकूम सुटतील, ते बजावण्याचेंच काय तें काम गांवच्या पाटील–कुलकर्ण्याकडे उरलें व त्या हुकुमापुढें मान वाकविण्यापलीकडे गावकऱ्याचें महत्त्व राहिलें नाहीं. बलुतेदाराचे हक्क

सरकाराकडून कायदेशीरपणें मानलें गेले नाहींत. एवढ्यावरच हा अनिष्ट प्रकार न थांबता ग्रामसंस्थेस अत्यंत प्रतिकूल वारें वाहू लागले. आग-गाड्यांतून येणाऱ्या परदेशी मालानें खेड्यांतील उद्योग–धंदे बुडाले. धंदे बुडाल्यामुळें रिकामे झालेले कारागीर व शेतकरी त्याच आगगाड्यांत बसून मुंबई, अहमदाबाद, कराची हीं शहरें पाहावयास गेले. आणि वर्तमान-पत्रांतून अपरिचित व उलटसुलट विचारांची चर्चा येत राहिली. त्याचा परिणाम असा झाला कीं, खेडेगांवांतील जुनी शिस्त नष्ट झाली, बंधनें मोडलीं, ग्रामिक जीवित निर्जीव झाले व खेड्यावर प्रेतकळा आली. परकीय राज्य व त्याच्या मदतीनें उत्पन्न झालेले जोरदार उलट प्रवाह याजपुढें वाहून गेलेली ग्रामसंस्था हिचें पुनरुज्जीवन करणें अनुकूल परिस्थिति प्राप्त झाल्यावांचून फार कठीण आहे. तथापि खेडेगांवांतून नवीन वारें खेळविल्यावांचून नोकरशाहीस लोकमताचा शह देणेंहि शक्य नाहीं." वाचकहो! या उताऱ्यांत वर्णिलेल्या स्थितींत फक्त परकीय अंमल असला, तरी त्याहून अद्याप विशेष बदल झाला नाहीं, असें आम्हांस वाटतें! असो.

वरील उताऱ्यावरून, आणि आम्ही आमच्या "मुलांच्या मार्गदर्शका"त वर्णिलेल्या स्थितीवरून, खेडेगांवाची स्थिति कशी आहे व तिच्या सुधारणेसाठीं कोणकोणत्या गोष्टींचा विचार आपणांस केला पाहिजे आणि काय केलें असतां "ग्रामसंघटने"चें कार्य पुरें होईल, हें आपणास स्पष्ट कळून येणार आहे! अर्थात् या कामीं लागणारा वेळ, वित्त, विद्या व वय ह्यांतील बहुतेक गोष्टी 'प्रौढ पेन्शनरांचे'च अंगीं असल्यामुळें त्यांनींच ह्या कामीं पुढाकार घेतला पाहिजे, हें उघड आहे! किंबहुना, हिंदुसंघटनाप्रमाणेंच या ग्रामसंघटनाचे कामीं आपणापैकीं प्रत्येकास काय करतां येईल, हें ज्यानें त्यानें आपणा स्वतःशीं पाहून त्याकामीं प्रयत्नाची पराकाष्ठा करण्यास मुळींच चुकू नये व कधींहि कटाळूं नये, एवढेंच आमचें सर्वांना हात जोडून सांगणें आहे! सर्वच बाबतींप्रमाणें

याहि बाबतींत धनिक श्रीमताचा व वर सांगितलेल्या खऱ्याखुऱ्या 'राष्ट्रीय-शिक्षणानें' अलकृत झालेल्या तरुणाचा विशेष उपयोग होणार आहे, हें वेगळें सागणें नकोच! पण अंत:करणाची खरी कळकळ आणि तळमळ असली म्हणजे झाडाखालीं घोंगडी टाकूनहि पुष्कळसें काम करता येत नाहीं असे नाहीं! अर्थात् पैशावाचून नडेल तेथें श्रीमताचा सहृदय आसरा हवाच! पण त्यासाठींच केवळ अडून न बसतां, हातून होईल ते कार्य करीत असावें! कारण, सर्वच कामे सर्वदा पैशानेंच होत असतात असे नाहीं, हें तत्व व शिवाय ह्या काय, किंवा, असल्या कोणत्याहि सत्कृत्याच्या बाबतींत काय, "अकरणान्मदकरण श्रेय:" आणि "स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात्–" हीं दोन वचनें नेहेमीं प्रत्येकानें हृदयांत कोरून ठेवलेलीं असावींत, हेच आमचे सर्वांना सागणे आहे! असो.

आता पुढचा प्रश्न 'साक्षरता प्रसारा'चा होय! सद्गृहस्थहो, तुम्हाला सागितल्यास आश्चर्य वाटेल, कदाचित् तुमच्यापैकीं कित्येकास माहितहि असेल कीं, आपल्या ह्या हिंदुस्थान देशात 'साक्षर' लोकाची–म्हणजे ज्यांना लिहिता वाचता येते अशा लोकाची सख्या शेंकडा अवघी दहा आहे! जी सख्या युरोप अमेरिकेंत शेंकडा ८०–९० पर्यंत असते तीच आपल्याकडे अवघी दहा आहे,–म्हणजे तिकडल्या अज्ञानी माणसाची सख्या: ती इकडच्या ज्ञात्यांची सख्या होय! अर्थात् अशा स्थितींत "वधूच्या गतायुष्याइतकें वराचे शेषायुष्य" राहिलेल्या थाटाचे वृद्ध-कुमारीविवाह व्हावेत, तसेच बालमृत्यूचे प्रमाण विलायतेंत १९४३ सालीं हजारी अवघे ४३ असता आपणाकडे मात्र ते १६३ असावें, ही किती शरमेची गोष्ट आहे बरे? पण असें का व्हावें, ह्याचा विचार करू गेल्यास त्याच्या बुडाशीं जी अनेक कारणे आहेत, त्यांत अज्ञान हें एक प्रमुख कारण आहे! ऐहिक वा पारलौकिक अवनतीला मुख्य कारण हें अज्ञानच असतें! धर्माच्या शुद्ध स्वरूपांत शिर लेलीं सोंगेढोंगें, समाजाच्या शुद्ध सहकारितेंत शिरलेल्या अनेक अनिष्ट व विद्रूप

चाली, स्वदेशाच्या पूर्ववैभवाचे आणि चालू स्थितीचे अज्ञानाभावीं दिसून येणारा स्वदेशाभिमानाचा खडखडाट, शरीराची व नीतीची हानि होऊन कौटुंबिक सुखाचा नाश व धर्माची पायमल्ली कशी होते याचा ठसा हृदयात न पडल्यामुळे जडणारीं व जडलेलीं नि सहसा पुसलीं न जाणारीं मद्यपान, जुगार, वेश्यागमन इत्यादि व्यसनें, व गलिच्छ राहणीची हौस, अशा कितीतरी अनिष्ट गोष्टींचा चित्रपट केवळ एका अज्ञानाच्या पडद्यावर आपणास आपल्या अंतरिच्या ज्ञानदिव्याचा झोत त्यावर पाडून पहाता येतो! पण हें सर्व अनर्थ टाळायचे असतील, सावकाराचे खोटे दस्तऐवज व उलटेसुलटे हिशेब उमगून शेतकऱ्याच्या मागचा 'सावकारी पाश' सुटायला हवा असेल, त्याचे व शेंकडा ८० लोक खेड्यापाड्यातून रहातात त्याचेहि जीवन सुखकर व्हावें अशी इच्छा असेल, तर त्याला साक्षरताप्रसार—म्हणजेच ज्ञानाचा प्रसार हाच एक उपाय आहे! आणि म्हणूनच "अतरिचा ज्ञानदिवा मालवू नकोरे!"—असें सोहिरोबा मोठ्या कळकळीनें सागत आहेत! कारण, 'ज्ञानाग्नि' सर्व कर्माप्रमाणें सर्व दोषाचेंहि भस्म करीत असतो—त्याना 'भस्मसात्' करीत असतो—हें लक्षात ठेवले पाहिजे! तिकडचा मजूरहि ट्रामवेंत पत्र वाचतो, तर इकडचा हुजूरहि केवळ शिळोप्याच्या गप्पागोष्टींत गुंग असतो! स्वतःची सहीसुद्धा करता न येणारे इसम म्युनिसिपॅलिटीचे प्रेसिडेंट होऊन "नगरदेवते"चे वाभाडे काढीत असतात! असे किती म्हणून देखावे वर्णावे? देशाचे दुर्दिन अजून संपले नाहींत, हेंच खरें! असो.

साक्षरतेंत लिहिणें, वाचणें, आणि हिशोब करता येणें या तीन गोष्टींचा समावेश होत असून इंग्रजी साक्षरतेची कल्पनाहि "Three 'R's" म्हणजे "Reading, Writing, & Arithmetic" अशीच आहे! ह्या तीन गोष्टींची अत्यंत आवश्यकता कशी आहे तें वर सांगितलेंच आहे, आणि ही आवश्यकता जाणूनच "सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाच्या कायद्या"-बाबत कै. नामदार गोखले १९१० सालीं इतकें झगडले! कारण, चालू

मुंगीच्या पावलाच्या गतीनें शिक्षणप्रसार करायचा म्हटल्यास विलायते-इतकी जनता सुशिक्षित होण्यास ४००|५०० वर्षे अजून सहज लागतील, असें त्यानींच व इतरानींहि सप्रमाण सिद्ध करून दिलें होतें! आकडेशास्त्र व वस्तुस्थितीच्या जोरदार बळावर कौन्सिलातील विद्वान पुढारी लोक वादाचा झगडा खेळत असल्यामुळें, कितीहि निगरगट्ट झालें तरी सरकारला ती गोष्ट त्यावेळीं नाकबूल करता येणें शक्यच नव्हतें! पण बोलून चालून परकी सरकारच तें! तें अर्थात् " पाहू, करू, कमिशन नेमू, मतें मागवू, विचार करू " वगैरे हजार बयादी लावून हा प्रश्न अगाबाहेर टाकणार, व तसा त्यानीं तो आपल्या अमदानींत टाकलाहि होता, हें सर्वांना ठाऊकच आहे! त्यानतर " सोपीव खात्यात " त्याची गणना इंग्रज सरकारनें केली असली तरी खजिन्याची किल्ली जोवर सरकारच्या हातीं होती, व लष्करावरील ५५|६० कोट रुपयाच्या खर्चात व इतरहि अव्वाच्या सव्वा होणाऱ्या खर्चांत काटकसर करून शिक्षणदानासारखें पवित्र कार्य करण्यास मदत करण्याची सद्बुद्धि जोवर सरकारास होत नव्हती, तोंवर " सोपीव खात्या"च्या गप्पा मारायला सोप्या असल्या तरी त्या केवळ पोकळ होत्या! कारण " दिसनेमे दब्बू और चलनेमे शिवराई " अशीच त्यांची स्थिति होती! असो. तर इंग्रज सरकारने स्वराज्यदानापर्यंत जो शिक्षणप्रसार केला, तो केवळ 'दर्यामे खसखस' याच स्वरूपाचा झाला असून, त्याच्या शेंदीडशे वर्षांच्या कारकिर्दीला खरोखर तो लाछनास्पदच होता,—इतकेंच नव्हे, तर आमच्या स्वराज्याच्या नालायकीचें प्रमाण म्हणून जेव्हा तीच गोष्ट तेंच सरकार आम्हास निर्लज्जपणें सागें, तेव्हा तर खऱ्या देशभक्तास त्यामुळें चीडच येत असे! असो.

पण ही झाली परकी अंमलांतील शिक्षणदानाची कथा! व त्या-वेळींहि आपण,—विशेषतः आपल्यांतले विद्या, वित्त, इत्यादींनीं युक्त असणारे पेन्शनर लोकांनीं स्वदेशोद्धारार्थ या शिक्षणादि कामीं खुद्द खेड्या-पाड्यांतून जाऊन किती उजेड पाडला, तो आपणास ठाऊकच आहे! परंतु आतां आपलें सरकार आलें असल्यामुळें, व तें मागील परकीय अंमलांत

झालेली शिक्षणदानाची आबाळ भरून काढण्याचा आपणाकडून शिकस्तीचा यत्न करीत असल्यामुळे, आपणातील प्रत्येकानें त्या कामीं होईल तो हातभार सरकारला लावणे हें आपलें अत्यंत पवित्र असें आजचें 'राष्ट्रीय कर्तव्य 'च आहे, व तें आपण यथाशक्ति बजवावें, एवढेंच आमचें त्या कामीं सर्वांना पुनःपुन्हा सांगणें आहे! धनिकांच्या उदार दातृत्वाचा ओघ येथेंहि कामीं येईलच, हें पुन्हा सांगितलेंच पाहिजे काय? असो.

आता शेवटचा राष्ट्रीय कर्तव्याचा प्रश्न म्हणजे भाषावार प्रांतरचनेचा होय! या कामीं वास्तविक महात्मा गांधींच्या व कॉंग्रेसच्याहि पूर्वीच्या वचनानुसार कॉंग्रेसचे पुढारी राज्यकर्ते या प्रश्नाच्या समाधानकारक सोडवणुकीला बांधलेलेच आहेत. परंतु 'दार कमिशन' नेमून तेव्हांपासून आपलें सरकार केवळ या प्रश्नाच्या दारापर्यंतच येऊन ठेपलें आहे! सदर कमिशनपुढे झालेल्या दणदणीत साक्षीवरून तरी पंडित—पटेल—पट्टाभि या त्रैमूर्तींनी योग्य तो निर्णय द्यायला पाहिजे होता! परंतु, त्या कमिशनच्या सभासदांना सूचना देतानाच जिथें पक्षपात दाखविला गेला, तिथें त्या साक्षींचा तरी काय उपयोग होणार व वरील त्रयी तरी दुसरा कसला निर्णय देणार? त्यांनीं 'तत्व' मान्य केलें, पण " दमानें घ्या!" हे पालुपद चालूच ठेवलें! त्याची "नवयुग"कार अत्र्यांनीं व त्याच्या दत्तु बांदेकरांनीं आपल्या हास्यरसपरिप्लुत आणि चुरचुरीत लिखाणानीं रेवडी उडविली तरी निगरगट्ट सरकार "मुंबई"वर अडून पडलें! व तत्पूर्वींहि "प्रांतीयता निर्माण होईल" वगैरे नसत्या सबबी सांगत राहिलें! वास्तविक, "अखंड भारता"चा आग्रह धरणाऱ्या सर्व जनमताला डावलून, त्याची पर्वाहि न करता, ज्यांनीं पाकिस्तानासहि संमति दिली, त्यांनीं असल्या सबबी सांगत सुटावें, हे किती विचित्र आहे बरें? पण भांडवलदारांना खूष करण्यासाठीं, त्यांच्या आहारीं गेलेल्या सरकारनें, इतर कित्येक चुकाप्रमाणें हीहि चूक न करावी तर काय करावें?

बरें, खुद्द आपल्या राज्याविरुद्ध असफजाहि झेंडा उभारून हिंदु जनतेला " त्राहि भगवान् " करून सोडणाऱ्या रझाकाराच्या व रझवीच्या वल्गना ज्याच्या जोरावर चालत होत्या त्या आपल्या शत्रुतुल्य असलेल्या निजामाला, जरा उशीरानें का होईना, पण जागृत झालेल्या नेहरूसरकारनें, सरदार पटेलासारख्या पोलादी पुरुषाच्या साह्यानें, 'पोलिस ॲक्शन्'च्या जोरावर अवघ्या चार दिवसात " दातीं तृण धरावयास " लावलें, त्याच सरकारने, खरें पाहता, पूर्वीचा सर्व इतिहास लक्षात घेऊन, निजामाला पदच्युत करून, त्याच्या तीन भाषा बोलणाऱ्या तीन प्रकारच्या प्रजाजनाचा मुलुख त्याच्या त्याच्या प्रातात वाटून देऊन, भाषावार सोयी-स्कर रचना करावयास नको होती काय ? परतु निजामाला पदच्युत कर-ण्याऐवजीं राज्यप्रमुख करण्यात जशी आपल्या सरकारची मुस्लिमधार्जिणी वृत्ति दिसली, त्याचप्रमाणे त्याच्या राज्याची वरीलप्रमाणें विभागणी न करण्यात आपल्या सरकारचा निव्वळ हटवादीपणाच दिसत नाहीं काय ?

यासाठीं, " सयुक्त महाराष्ट्र "चा प्रश्न मुंबईसह कसा सोडवणें जरूर आहे, व त्याकामीं उपरिनिर्दिष्ट चुका आपल्या सरकारकडून कशा घडल्या व घडत आहेत, याचा इतिहास आपल्या समजस मुलामुलींना सागून पटवून देणे व सरकारने योग्य निर्णय तत्काळ घेण्यासाठीं आपणा-कडून होईल तो प्रयत्न करणें, हेंहि एक आजचें सर्व सद्गृहस्थवाचकाचें 'राष्ट्रीय कर्तव्य'च होय, असे म्हटल्याशिवाय आमच्याने राहवत नाहीं ! तरी त्याकडे सर्व विचारी वाचकानीं अवश्य लक्ष द्यावें, व यथाशक्ति त्या कामीं झटत असावे, ह्यापेक्षा जास्त काय सागूं ?

याप्रमाणें राजकीय स्वरूपाचे प्रश्न आपले पाहून सपले ! तत्पूर्वी सामाजिक प्रश्नहि आपण पाहिले, व तत्पूर्वी समाज व कुटुंब याच्या सबध-दर्शक कौटुंबिक कर्तव्याचेहि आपण अवलोकन केलें ! या सर्व प्रश्नासंबंधीं, फार काय, आमच्या सर्वच ग्रथाच्या उद्देशाप्रमाणें सर्वच ग्रंथासंबंधीं—आम्हास हेंच सागायचें आहे कीं, आमचा प्रत्येक ग्रथ वाचून पाहून प्रत्येक वाचकाने

त्यांतील प्रश्नावर विचार करावा, व त्याकामीं आपलें स्वतःचें असें एक ठाम मत ठरवून, त्या ध्येयानुरूप आपली वागणूक करावी!—मग तो बाल, तरुण, वा वृद्ध कोणीहि असो! प्रत्येकाची वागणूक—आणि विशेषतः तरुण व प्रौढ वाचकाची वागणूक तर ध्येयपूर्ण झालीच पाहिजे! तशी झाली तरच त्यात अर्थ आहे, नाहींतर, "खाना, पीना, मजा उडाना, और दो दीनके पास एक दीन मर जाना!—" असें वागण्यात काय मौज आहे? मग त्याला मनुष्य-जन्माची काय आवश्यकता आहे? पशूच्या जन्माची मागणीच मग देवापाशीं केलेली अधिक बरी! पण "पशु" हा शब्दसुद्धा सहन होत नाही—अगदीं पशुतुल्य वागणुकीच्या मानवी पशूलाहि त्याने शरम वाटते—यातच त्याच्या उन्नतीचे बीज परमदयाळु व अत्यत कारुण्यपूर्ण दयाघन भगवतांनें ठेविलें आहे! तेव्हा त्या बीजाचाच वृक्ष करावा, यापेक्षा अधिक काय सागावें? आता मातापित्याची भक्ति व वरील प्रश्नाच्या सोडवणुकीच्या वेळीं "प्रेम कीं कर्तव्य" याचा उलगडा कसा करावा, याचा विचार पुढील प्रकरणीं करूं!

———

नक्षत्र १३ वें

## मातापित्यांचा मान व कर्तव्याचें परिपालन !

सद्गृहस्थहो, मी तुम्हाला पहिल्या प्रकरणापासून ते आतापर्यंत, आपल्या गृहापासून ते देशापर्यंत आपली वागणूक कशी ठेवावी, त्याकामीं कोणकोणच्या गोष्टींचा विचार करून कोणकोणचे निर्बंध आपण पाळले पाहिजेत व कशा विशिष्ट तऱ्हेने व कोणत्या ध्येयाने आपली वागणूक झाली पाहिजे, तें येथवर सांगितलें. त्या कामीं, म्हणजे तदनुरूप आपलें आचरण चालूं असतां, आपल्या जुन्या मताच्या, संकुचित वृत्तीच्या, व ऐहिकातच बुडालेल्या अशा आपल्या वृद्ध मातापित्यांचा अडथळा आपणास येण्याचा संभव आहे, व व्यक्ति ह्या नात्यानीं, ते आपले स्वतःचे मातापिता म्हणून, 'मातृदेवो भव' 'पितृदेवो भव' म्हणून आपण त्यांचा कितीहि आदरसत्कार केला, त्याना इतर सर्व रीतीनें सुख देण्यासाठीं आपण कितीहि झीज सोसून आपल्या जिवाची पराकाष्ठा केली, 'आई' आणि 'बाप' ह्या शब्दाबरोबर त्या दिव्य प्रेमळ नात्यानीं आपला कंठ व नेत्र कितीहि भरून आले, तरी पण त्याच आपल्या कुसुमकोमल हृदयाला येथवर सांगितलेल्या कर्तव्याच्या कठोर परिपालनार्थ प्रसंगीं वज्रापेक्षांहि कठोर करणें भाग पडतें, आणि तरीहि आपण पूज्य आणि वंदनीयच कसे ठरतों, तेंच मी आपणास आतां कांहीं उदाहरणें घेऊन सांगणार आहे।

पैकीं पहिलें उदाहरण भक्तश्रेष्ठ प्रल्हादाचें घ्या ! त्याच्या पित्याची काय बरें त्याला आज्ञा होती ? "ज्यानें तुझ्या सख्ख्या चुलत्याला ठार मारलें त्या विष्णूचें नांव, त्या श्रीहरीचें नाव, त्या नारायणाचें नांव तूं घेऊं नकोस ! अशी माझी तुला आज्ञा आहे !" असेंच तो हिरण्यकश्यपु म्हणाला

होता ना ? अशीच त्याची आज्ञा होती ना ? मग ती प्रल्हादानें पाळली काय ? ती त्यानें कितपत पाळली बरें ? "मुळींच पाळली नाहीं !" हेंच याचें उत्तर नव्हे काय ? प्रल्हादाला काय पुत्रधर्म माहीत नव्हता ? त्या भक्त-श्रेष्ठाला पुत्रधर्माची जाणीव दुसऱ्यानें देण्याची जरूर होती काय ? मग असें असताहि त्यानें पित्याची आज्ञा अमान्य का बरें केली ? तर ती देवाधर्माविरुद्ध होती—आत्मोन्नतीला विघातक होती—अधोगतीला नेणार होती !—हेंच याचें उत्तर नव्हे काय ?

दुसरें उदाहरण भरताचें—त्या रामरायाच्या लाडक्या भक्ताचें घ्या ! भरताला त्याच्या मातेची काय आज्ञा होती बरें ? "भरता, ह्या अयो-ध्येच्या राजसिंहासनाची प्राप्ति मी तुला करून दिली आहे, तुझ्या हक्काची ही गादी आहे ! हीवर तू खुशाल बैस, आणि राजमाता म्हणून मला मिरवूं दे !" अशीच तिची आज्ञा होती ना ? 'मातृदेवो भव' या वचनाची किंमत भरतासारख्या भगवद्भक्ताला तुम्हाआम्हासारख्या पाम-रानीं सांगण्याची जरूर होती काय ? मग असें असताहि त्यानें मातेची आज्ञा अमान्य करून, सात्विक संतापानें थरथरणारा पण रामप्रेमानें गहि-वरलेला भरत रामापाठोपाठ का बरें धावला ? मातेची अवज्ञा त्यानें का बरें केली ? याचेंहि उत्तर, ती देवाधर्माविरुद्ध होती—अधोगतीला नेणारी होती, हेंच नव्हे काय ?

तिसरें उदाहरण शिवाजी महाराजाचें घ्या ! विजापूरच्या पादशाही दरबारांत बादशहाला कुर्निसात् करायला सांगणाऱ्या आणि बडखोरवृत्तीचा त्याग करावयास उपदेशिणाऱ्या शहाजीराजाची आज्ञा त्या बाल व तरुण शिवाजीनें ऐकली काय ? याकामीं 'शहाशिवाजी' नाटकांतील शिवाजी व शहाजीचा संवाद मोठा वाचनीय आणि मननीय झाला असून, तो रा. हरणीसानीं मोठ्या परिणामकारक वाणींत रेखाटला आहे, ह्यांत शंका नाहीं ! वाचकांनीं तो अद्याप वाचला नसल्यास अवश्य वाचून पहावा, असें आमचें

त्याना सागणें आहे! पण इथेंहि प्रश्न हाच कीं, शिवाजीनें स्वपित्याची आज्ञा अमान्य का केली? तर त्याचेंहि उत्तर ती देवा-धर्माविरुद्ध होती,—स्वदेशाला अधिकाधिक पारतंत्र्यांत पिचवणारी होती,—असेंच नव्हे काय?

चौथें उदाहरण श्रीसमर्थ रामदासस्वामींचें घ्या! मातापित्याना दुःख देऊन ते वनात का बरें पळून गेले? मातेच्या इच्छेचा हिरमोड त्यानीं का बरे केला? त्याना काय मातेची योग्यता माहीत नव्हती? मग असें का बरे झालें? याचेंहि उत्तर,—ती इच्छा व आज्ञा त्याच्या मताला मिळणारी नव्हती—स्वदेश, स्वधर्म, स्वसमाज याच्या उद्धाराच्या आड येणारी होती—अर्थात् देवाधर्माविरुद्धच ती होती, व म्हणूनच ती अमान्य केली गेली,—हेंच नव्हे काय?

आद्यशकराचार्य, मिराबाई, एकनाथ, नामदेव, इत्यादिकाचा इतिहासहि आपणास हेंच सागत आहे कीं, त्याच्या मातापित्याच्या इच्छा ह्या त्याना भवबंधात पाडणाऱ्या, कर्तव्यविन्मुख करणाऱ्या, मायापाशात गोवणाऱ्या, आणि अधोगतीला नेणाऱ्या वाटल्या म्हणूनच त्यानीं त्या अमान्य केल्या! एकदरींत देश,धर्म,समाज,आत्मा, राष्ट्र, इत्यादि कोणत्याहि उच्च भूमिकेवर मनुष्य चढला, त्या भूमिकेवरची कर्तव्यें करण्याची त्यास पाळी आली, कठोर कर्तव्यपरिपालनाची वेळ येऊन ठेपली, म्हणजे मनुष्यानें व्यक्तिगत बधनाचे पाश खडाखड तोडून मोकळे झालें पाहिजे,—दुबळ्या तत्वज्ञानाच्या आड दडून अर्जुनाप्रमाणें "गाडीव स्त्रसते हस्तात्त्वक्चैव परिदह्यते॥" अशा प्रकारचे नेभळटासारखे उद्गार काढता कामा नयेत,—हेंच ह्या सर्वांचें सार असून समर्थांनीं आपल्या खणखणीत वाणींत तेंच सागितलें आहेः—

"देवाच्या सख्यत्वासाठीं। पडाव्या जिवलगासी तुटी। सर्व अर्पावें शेवटीं। प्राण तोहि वेचावा!॥" असे त्याचें सागणें असून, तुकोबाहि म्हणतातः—

"देव जोडे तरी करावा अधर्म । अतेरे ते कर्म नाचरावे ॥ १ ॥
प्रल्हादें जनक बिभीषणें बधू । वद्या माता निधू भरतें केली ॥ २ ॥
तुका म्हणे सत्यकर्मा व्हावें साह्य । असत्यासी भय नरका जाणें ॥ ३ ॥"

अर्थात् असत्यकर्माचें आचरण प्रत्यक्ष मातापित्यानीं सांगितलें असलें तरी करू नये, कारण त्यानें 'नरका जाणें' चे भय कांही टळणार नाहीं वा ढळणार नाहीं,–नरकाचा निवास त्याने चुकणार नाहीं,–हे खास ! किंबहुना, असत्य, अधर्म, यांची बाजू घेणाऱ्या सर्वच नातलगाचीं नातीं त्याचक्षणीं तुटून जातात व सत्य, धर्म, न्याय, इत्यादि सनातन तत्वेंच श्रेष्ठ ठरतात हीच गोष्ट खरी ! मातापितादि नात्याची महती आमचा धर्म जितका जाणतो, तितकेंच—

" यथाकाष्ठं च काष्ठ च समेयाता महोदधौ । समेत्यच व्यपेयाता तद्वद्भूतसमागमः ॥ " ह्या उच्च तत्वज्ञानाची ओळखहि त्यास त्याच-वेळीं पूर्ण असतें, व वरीलसारख्या प्रसगीं आपल्या कठोर कर्तव्यपालनासाठीं तो ह्या तत्वज्ञानाची समशेरहि ऐहिक प्रेमाचे पाश तटातट तोडण्यास उपसल्यावाचून रहात नाहीं, हीच आपल्या धर्माची महती आहे ! हीच ती प्रवृत्तिनिवृत्तीची गोड सांगड ! इतका उदात्त कर्तव्यप्रतिपादक धर्म जगाच्या पाठीवर अन्य असेल काय ?

यासाठीं अशा उच्चतम धर्मांत व उच्चतम आर्यावर्तदेशांत जन्मलेल्या महाभाग सद्गृहस्थानो, तुम्ही येथवर सांगितलेलीं सर्व कर्तव्यें ह्याच उदात्त ध्येयानीं पार पाडा,–हेंच माझें तुम्हास पुनः पुनः सांगणें आहे !

पण याचा अर्थ तुम्ही बाईलबुद्धे बनावें व आपल्या आईबापाची हेळसांड पुंडलिकाप्रमाणें करावी असा मुळींच नसून, त्याला पुढें उपरति झाल्यावर त्यानें जशी मनोभावानें त्यांची सेवा केली, तशीच तुम्ही केली

पाहिजे, असेंच माझें तुम्हाला सांगणें आहे ! या कामीं माझ्या " मुलांच्या मार्गदर्शका "तील प्रथम व द्वितीय प्रकरण आपण अवश्य वाचून पहा, एवढीच माझी तुम्हाला विनति आहे ! खरोखरच:—

" पलगी बैसवोनि राणी । मातेहातीं आणवी पाणी ॥ १ ॥
स्त्रिये पाटावाची चोळी । माता अखड चिंध्या गाळी ॥२॥"—

इत्यादि प्रकारचा देखावा कोणाहि सहृदयास चीड आणणारा आहे, ह्यात शका नाहीं ! अर्थात् अशा प्रकारच्या कलियुगसंचारानें माता-पित्यांच्या सेवेच्या आपल्या धर्माचें वाटोळे करू नका, हेंच माझें तुम्हाला पुन:पुन्हा सागणें आहे ! वास्तविक, असा प्रसगच येऊं नये म्हणून, वयाच्या पन्नासाव्या वर्षी, मुलें कर्ती सवरतीं झाल्यावर, नव्याजुन्याचा नसता झगडा माजवीत न बसता, समजस पालक पित्यानीं आपल्या पत्नीसह वानप्रस्था-श्रमाचा स्वीकार करून, मुलावर सर्व ससाराची जबाबदारी टाकून, "ग्रामसघटना"सारख्या कार्यासाठीं आपल्या शेतीवाडीवर, अगर एखाद्या चागल्याशा खेड्यात जाऊन रहावयास हवें, व पुढचें कार्य करावयास हवें ! तें टाकून, म्हणजे स्वकर्माचरणाचें योग्य परिपालन सोडून देऊन, त्यानीं घरीं राहणेंच आधीं अनुचित,—धार्मिकदृष्ट्याहि अनुचित, पारमार्थिकदृष्ट्याहि अनुचित, व येथवरच्या कर्तव्यपालनाचे बाबतींत होणाऱ्या मतभेदाचे दृष्टीनेंहि अनुचितच ! बरें, त्यातून रहावयाचें तर त्याला तितकी दिलदार वृत्ति, व—" प्राप्तेतु षोडषे वर्षे पुत्रं मित्रवदाचरेत् ॥"—हें उत्कृष्ट मार्गदर्शक वचन सदैव डोळ्यापुढें ठेवून, आपल्या लेकीसुनाची व मुलाबाळाची सेवा-सुश्रुषा घेत व त्याना जरूर तेथे सल्लामसलत देत राहायचें, तें सोडून त्यात मानापमानाच्या नसत्या कल्पना उत्पन्न करणें किती चूक आहे बरें ! पण तें कांहीं झालें तरी, अशा वेळीं आपण त्या त्राग्याला बळी पडता कामा नये, हेंच माझें सर्वांना सांगणें आहे ! कै. न्यायमूर्ति माधव गोविंद रानडे याची 'विधवाविवाह' ह्या प्रश्नावर नाचक्की अशा बळी पडण्या-

मुळेंच झाली, हें विसरून चालणार नाहीं! 'बोलल्याप्रमाणें कृति केल्या-शिवाय लोक उगाच पावलें घरीत नसतात' हें लक्षात ठेवलें पाहिजे! सभेंत सव्वा हात पांडित्य करून घरीं आल्यावर आईबापाच्या अगर नातलगाच्या आड दडणें हा भ्याडपणा आहे, आणि याचीच चीड येऊन—

"क्लैब्यं मास्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते।"—

हाच माझा सर्व गृहस्थाश्रमीयांना या कामीं अखेरचा संदेश आहे! आतां पुढच्या प्रकरणीं 'उपसंहारा'चें कार्य करून मी सर्व सद्गृहस्थांची रजा घेणार आहे! चला तर आतां त्याच विचारास लागू

———

नक्षत्र १४ वें

# उपसंहार

सद्‌गृहस्थहो, या उपसंहारात मला शेवटीं तुम्हाला हेंच सांगायचें आहे कीं, माझें हेंच पुस्तक नव्हे, तर सर्वच पुस्तकें आपण अजून वाचली नसल्यास विचारपूर्वक वाचा, उगीच वरवर पाणी उडवल्यासारखें करूं नका, व त्याकामीं आपल्या प्रत्येक कृतीचें प्रत्येक पाऊल, मग तें लहान गोष्टींत असो वा मोठ्या गोष्टींत असो, आपल्या देशाच्या, धर्माच्या, नीतीच्या, देवाच्या, समाजाच्या, राष्ट्राच्या आणि आत्म्याच्या कल्याणासाठीं आणि उन्नतिसाठींच पडत आहेना, ह्याचा विचार करा! हे मी आपल्याला गर्वानें सांगत नाहीं, तर तळमळीनें सांगत आहे; माझी मोठी योग्यता म्हणून मी हें मिरवीत नाहीं, तर केवळ "बुडते हे जन न देखवे डोळा। म्हणोनि कळवळा आला त्याचा!॥" ह्या भावनेने मी हे बोलत आहे! माझी योग्यता जनताजनार्दनचरणाच्या रजःकणाची आहे, समाजाचा मी एक अनधिकारी नम्र सेवक आहे! पण हृदयाची तळमळ राहीना, म्हणूनच केवळ बोलतों आहे; तरी—

> "बोलिलीं लेकुरें। वेडींवाकुडी उत्तरें॥
> क्षमा करा अपराध। महाराज तुम्ही सिद्ध॥
> तुका म्हणे चरणीं। दृढ घातली लोळणी॥"—

या तुकोबांच्या शब्दांत माझी सर्वांना प्रार्थना आहे कीं, सर्वांनीं थोर मनानें याचा विचार करावा! नामदेवाप्रमाणेंच—

"एकमेकां साह्य करूं। अवघे धरूं सुपंथ!॥"—

हेंच माझें ब्रीदवाक्य आहे! आपला देश, आपला धर्म, आपला समाज व आपला आत्मा आज अधोगतीला जात आहे, स्वातंत्र्य मिळतांना व

तदनंतरहि निरनिराळया भुतांनीं व विविध मायामोहांनीं त्याला झपाटलें आहे, तो विमोहित–' मॅड '–झाला आहे, त्याला त्यातून आपणास मुक्त करावयाचें आहे व उच्च उज्वल अशा खऱ्या ' अभिनव भारता '–च्या शिखरावरील सात्विक आनंदाचा सुगंध शीतल वायू त्यास आपणास द्यावयाचा आहे ! आपणापैकीं प्रत्येकानें हें कार्य केलें पाहिजे ! यासाठीं––" उत्तिष्ठत जाग्रत ! प्राप्यवरान्निबोधत ! "–हेंच माझें सर्वांना हात जोडून सांगणें आहे! कारण लक्षात ठेवा, पुन्हा बजावून सांगतों तें विसरू नका कीं, " आयुष्य ही चैन नसून कर्तव्य आहे ! "–कर्तव्याच्या बंधनांनीं आपलें प्रत्येक पाऊल बांधलेलें आहे !–सद्सद्विवेकाचें अधिष्ठान आपल्या हृदयात आहे ! तेव्हा त्या 'बंधनाच्या पलीकडे' जाऊन, सद्सद्विवेकबुद्धीला पायाखालीं तुडवून, अविचारी पशूप्रमाणे " खाना, पीना,और सोना " अथवा "खाना, पीना, और मजा उडाना! "–अशीच अनर्गल व स्वैर वागणूक आपण ठेवली,तर चार दिवस ती चमन चालेल; पण अधिकाधिक दाबलेल्या चेंडूप्रमाणे, प्रचंड प्रतिबंधानें अडविलेल्या जलस्त्रोताप्रमाणें, ती आपली सद्सद्विवेकबुद्धि, ती कॉन्शन्स, ती बऱ्यावाईटाची टोचणी आतल्याआत देणारी न्यायदेवता, केव्हातरी उसळी मारून वर आल्यावाचून राहणार नाहीं !–आणि मग लेडी मॅकबेथप्रमाणें आपल्या कर्तव्यहीन आयुष्यातील आत्मिक, सामाजिक, धार्मिक, व राष्ट्रीय पातकाच्या काळयाकुट्ट डागाकडे, त्या अन्यायाच्या 'रक्तलांछना'कडे, पाहून आपणासहि झोंप येणार नाहीं !–आपण दचकून जागे होऊ, व ज्या हातांनीं आपण तीं कृत्यें केलीं त्याकडे पाहून, मनाचा मार असह्य झाल्यामुळें, अंतर्मुख वृत्तीनें, पश्चात्तप्त हृदयानें, आपणाहि लेडी मॅकबेथप्रमाणें म्हणू कीं––

" Ah ! all the perfumes of Arabia will not wipe it ! "—

तसेंच आपल्याकडे विविध संतांनीं वर्णिलेली मुमुक्षूची अवस्था आपणांस प्राप्त होऊन––

" उत्तम जन्मा येउनि रामा गेलों मी वाया ! ॥ " —

अशाप्रकारचे पश्चात्तापाचे उद्गार पुढेंमागें आपणास खास काढावेच लागल्यावाचून रहाणार नाहींत—निदान मृत्युशय्येवर तरी हा सद्विचार सुचतोच सुचतो ! पण मग त्याचा काय उपयोग ? यासाठीं वेळींच सावध व्हा व आपल्या कर्तव्यास लागा—कर्तव्यास जागा—हेंच माझें सर्वांना सांगणे आहे ! आपला समाज किती अधःपतित झाला आहे—सर्वच बाबतींत तो कसा झपाट्यानें खालीं खालीं जात आहे—याचें करुण व हृदय-भेदक चित्र मी माझ्या " भारतवर्षाच्या धार्मिक इतिहासां "त चालू समाजाचें अंतर्गत निरीक्षण करताना शेवटच्या प्रकरणातून, " मुलाच्या मार्गदर्शकांत " खेडें, शहर, व राष्ट्र अथवा देश यांचे दर्शन त्या बालकाला घडविताना त्या प्रकरणातून, "तरुणाच्या ताडेला"त 'अभिमानाचे सात सूर' सांगताना व इतरहि बहुतेक प्रकरणातून, व चरित्र-विषयक वा चर्चात्मक ग्रंथातून मधून मधून लिहिलेंच असल्यामुळें त्याची येथें पुनरुक्ति करीत नाहीं ! आणि त्याची जरुरी तरी काय आहे ? कारण त्या कामीं एकच जळजळीत सवाल सर्वांना टाकतों कीं, प्रत्येकानें अंतर्मुख वृत्तीनें विचार करावा, व आपलें आयुष्य कितपत आदर्शजीवन आहे याचा परमेश्वराच्या पायावर हात मारून निर्वाळा द्यावा ! अशी वेळ आल्यास आपल्यापैकीं बहुतेकाना, शेंकडा ९९ लोकाना, शरमेनें मान खालींच घालण्याचा प्रसंग येईल, यात शंका नाहीं ! पण असें का, अरे बाबा असें का, तुला काय बुद्धी नाहीं म्हणून तूं विचार करीत नाहींस ? तुझ्याठायीं काय भावना नाहींत, कां कर्तृत्व नाहीं, म्हणून तूं स्वस्थ बसलास ? असें विचारल्यास प्रत्येक इसम गांगरून जाईल व ' त—त—प—प— ' करा-यला लागेल ! यासाठीं माझी सर्वांना हात जोडून शेवटची एवढीच प्रार्थना आहे कीं—

" मुकी बिचारी कुणी हाका । अशीं मेंढरें बनू नका ! ॥ "—

आणि–" गतानुगतिको लोको न लोकः पारमार्थिकः ! "—या वचनालाहि आपल्या कृतीनें हाणून पाडण्याचा अटोकाट यत्न करा, तरच तुमची माणुसकी !–तरच तुमचा पुरुषार्थ !–बोला तर, अगदीं मनापासून बोला, अंतःकरणाच्या कळवळ्यानें प्रभूला हाक मारून प्रार्थना करा कीं, हे प्रभो—

" सहनाववतौ । सहनौ भुनक्तु । सहवीर्यं करवावहै ॥
तेजस्विनावधीतमस्तु मा विद्विषावहै ॥ ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥ "

× × ×

सद्गृहस्थहो, वास्तविक प्रस्तुतसारखे ग्रंथ लिहिण्याची का माझी योग्यता आहे ? पण त्या सूत्रचालक परमात्म्यानें मजला निमित्त करून हीं सर्व सूत्रें हलविलीं आहेत ! यात माझें असें काय आहे ?–व मी अभिमान तरी कशाचा धरावा ? त्या 'खांबसूत्रा'वर नाचणाऱ्या बाहुलीला आपल्या नाचाचा जितपत अभिमान वाटावा, तितपतच मलाहि वाटणें उचित होणार आहे ! यासाठीं अशा प्रकारची ही कृति ज्यानीं खरोखर लिहिली त्याच्याच चरणीं ती अर्पण करून, त्याच्याच रूपानें नटलेल्या तुम्हा सर्व रसिक संतश्रोत्यांना मी ज्ञानोबाच्या शब्दात हेंच म्हणतों कीं–

" एथ न्यून तें पुरतें । अधिक तें सरतें ।
करोनिया घ्या हे तुमतें । विनवीत से ॥ "–

कारण,—त्याच ज्ञानेश्वरांच्या शब्दात मी आपणांस विचारतों कीं—

" सिवतलियाहि परिसें । लोहत्वाचिये अवदसे ।
न मुकिजे अनायासें । तैं कवणा बोल्ह ? ॥
वोहळें हेंचि करावें । जें गंगेचें आंग ठाकावें ।
मगही गंगा जरी नोहावें । तै तो काय करी ? ॥ "

असें विचारल्यास आपण रागवाल काय ? शक्यच नाहीं ! कारण आपण परम दयाळु आहांत, हें मला ठाऊक आहे !–आणि म्हणूनच मी ही सल-

गांची भाषा एखाद्या बालकाप्रमाणें बोलत आहे! तुम्हा संतसज्जनापुढें मी खरोखरच केवळ एक बालक आहे! यासाठीं या बालकाच्या शब्दाकडे क्षणैक लक्ष द्या, विचार करा, व त्यात जर कांहीं घेण्यासारखें असेल तर—

—" बालादपि सुभाषितं ग्राह्यम् । "—

या आपल्याच थोर वचनाप्रमाणें त्याचा स्वीकार करा, यापेक्षा अधिक काय सागू? असो.

'तरुणाच्या ताडेलांत' या भवसिंधुच्या लाटाशीं झगडताना दमछाकीनें दमलेल्या त्या तरुणाला " रतीचिया बेटा। आदळती कामाचिया लाटा।" अशा प्रकारच्या 'गृहस्थाश्रमाच्या बेटावर' क्षणैक विश्रांति देण्यासाठीं हा प्रस्तुत ग्रंथ—हें " विवाहितांचें नक्षत्रदर्शन " लिहावें लागलें! पण त्यातहि त्यानें केवळ त्या 'कामाच्या लाटेंत'च गुगून न राहता, इतरहि कोणकोणचीं महनीय कर्तव्यें केलीं पाहिजेत, त्याचें प्रतिपादन येथवर केलें! त्या कर्तव्यांच्या बळावर व त्या लाटाच्या लहरींच्या पानावर पुन्हा दुप्पट जोमानें तयार झालेल्या मानवानें या भवसिंधूच्या अथाग प्रवाहात उडी घेऊन, आपल्या अमोघ व दमदार बाहुबलावर हा भवसागर कसा तरुन जावा व 'आपण तरोनि तारिलें। कृपालुपणें जग सर्व!॥'— अशा प्रकारें आत्मोद्धाराबरोबरच इतरहि कोणची कामगिरी त्यानें बजवावी, त्याचें समग्र व थरारून सोडणारें विवेचन—

— " **प्रौढांचें प्रबोधन !** " —

हा माझ्या पुढील ग्रंथात करण्याचें मी योजिलें आहे! तरी प्रस्तुत ग्रंथाप्रमाणें कर्तबगारी करता करता 'पन्नाशीची झुळुक' लागलेल्या माझ्या परमपूज्य वाचकांनीं आता तिकडेंच चलावें, हें बरें!

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

॥ शुभं भवतु ॥

## " नवशिवोदया " वरील रसिक अभिप्राय.

**सकाळ**—ता. २-१-४९

**नवशिवोदय** ( लेखक व प्रकाशक—गं. रा. साने बी. ए. बी. टी., सम्पादक, महाराष्ट्र साहित्य सेवक ग्रथमाला, पुणें न. २. पृष्ठसख्या ३२९, किंमत पांच रुपये. )

हें एक नमुनेदार आणि आदर्शवत् संस्थानिकाचें सुरस चरित्र आहे. यातील शिवराजाचें आयुष्य इतरांनीं कित्ता घेण्यासारखें आहे. यातील विचार मोठे सात्विक व सोज्वल आहेत. लेखकाची तळमळ वाखाणण्या सारखी आहे. त्यामुळें या कादम्बरींत मोटा ओलावा निर्माण झाला आहे. नुसत्या संस्थानिकांनाच नव्हे, तर इतरेजनानाहि हे पुस्तक उपकारक वाटेल. यातील नायकाचें नाव आणि इतर कृति शिवाजी महाराजाच्या नावाशीं आणि कृतींशीं पुष्कळ समानधर्मी आहेत. त्यामुळेंच या पुस्तकाला नव-शिवोदय असें सार्थकतेने म्हटलें आहे.

* * *

**केसरी**—दि. १९-४-४९

**नवशिवोदय** ( ले.व प्र.—गं.रा.साने, बी. ए. बी.टी., ८३ शुक्रवार, पुणें २. किं.५ रु. ) मराठी राज्याचे सस्थापक श्रीशिवछत्रपति महाराज आजच्या बदललेल्या परिस्थितींत जन्मास येऊन एखाद्या सस्थानाच्या राज-पदावर अधिष्ठित झाले असते तर त्याचें चरित्र कसें उतरलें असतें हा विचार सहज मनात येण्यासारखा आहे. ह्याच विचाराच्या प्रेरणेनें श्री. ग. रा. साने ह्यांनीं आपली "नवशिवोदय" ही कादबरी रचिली आहे. शिव-राज नामक एक सस्थानिक कल्पून त्याचें चरित्र या कादंबरींत रेखाटलें आहे व तें बरेंच यशस्वी झालें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

काचनपूरचे राजे रमणिकराय यांना शिवदेव नामक साधूच्या आशी-र्वादानें वृद्धपणीं पुत्रप्राप्ति होते. या पुत्ररत्नाचें नांव शिवराज. ह्याच कादं-

बरीचा नायक. धर्मप्रेम, प्रजावात्सल्य, उत्कट देशाभिमान, स्वाभिमान, जुलमाचा तिटकारा इत्यादि श्रीशिवछत्रपतींच्या अगचे गुण शिवराज्याच्या अंगींहि वसत आहेत. दोन शिवराजात साम्य निदर्शित करण्याकरिता व कादंबरी आकर्षक करण्याच्या दृष्टीनें चरित्र-विषयक बऱ्याच बाबींत साम्य दाखविलें आहे.

कादबरींतील कांहीं प्रसग हृद्य, कलात्मक व परिणामकारक वठले आहेत. गौरागीनें बालराजाना दाखविलेलीं रामायणातील चित्रें ( पृ. १२ ), शिवराजाची काचनपूरची पाहणी व बदललेली परिस्थिती पाहून त्याच्या मनात उद्‌भवलेले विचार ( पृ. ४५ ), पोलिटिकल एजटाशीं झालेला तड-फदार सामना ( पृ. १२२ ), स्वयसेवक अमरनाथ याचा लाठीहल्ल्यानें मृत्यु, शिवराजाचें स्वराज्यदान व राज्यत्याग ( पृ. २८९ ) हे प्रसंग खरो-खरच सरस वाटतात. नायक शिवराज, माता गौरागी, हुजऱ्या रामजी, स्नेही देशसेवक प्रल्हादराय या पात्राचीं शब्दचित्रें व स्वभाव-निदर्शनें बऱ्याच अशीं यथार्थ उतरलीं आहेत. एकदरींत कादबरी सरस व वाचनीय झाली आहे, यात शका नाहीं.

  

प्रसाद—जून १९४९

**नवशिवोदय** : ( लेखक व प्रकाशक—ग. रा. साने, पृ. ३२९, किं. ५ रु. )

विशिष्ट ध्येयानें कथा वाङ्मय लिहिणाऱ्या लेखकात श्री. ग. रा. साने याचें कार्य प्रसिद्धच आहे. कै. ना. वि. कुलकर्णी यांच्या ' महाराष्ट्र कुटुबमाले ' प्रमाणे श्री. साने याची ' महाराष्ट्र साहित्य सेवक ग्रथमाला ' आहे. प्रचलित प्रश्नाचा सांगोपाग विचार करून त्याचें आदर्श स्वरूपात कांहीं निश्चित उत्तर कथेच्या द्वारा वाचकांच्यापुढें ठेवणें अशी साने याची पद्धति सर्वश्रुत आहे. या कादंबरींत आदर्श सस्थानिकाचे चित्र रेखाटलें आहे. ही कादबरी १९४८ साली प्रसिद्ध झालेली असली तरी ती १२

वर्षांपूर्वी लिहिलेली आहे हें लक्षात घेतलें पाहिजे. ब्रिटिश राजवटींत संस्थानें आदर्श करण्याचें, होण्याचें कार्य तुरळक होत होतें. श्री. साने यांनी लिहिलेलें कथानक त्या काळाच्या पार्श्वभूमीसह वाचलें म्हणजे लेखकाचें ध्येयवादित्व स्पष्टपणें कळतें. युवराज शिवराज या नवयुगांतील तरुणाच्या मनातील लोकहिताभिमुख आकांक्षाचे चित्र अतिशय प्रभावी आहे. त्याच्या लोकहिततत्परतेमुळे त्यास प्रत्यक्ष वडिलांशीं व पोलिटिकल एजंटशीं झगडावें लागलें. संस्थानी राजवटींत प्रजेचा कैवार घेणें प्रत्यक्ष युवराजासही कसें कठीण होतें हा आता ‘ इतिहास ’ झाला असला तरी तो नेहमीं उद्बोधक राहील. कारण संस्थानें गेलीं व पोलिटिकल एजंट मावळले तरी त्याच्या मनोवृत्तीचे नमुने अद्याप आहेत आणि ते जगण्याची धडपड करीतच आहेत. अशा स्थितींत सरंजामशाहीच्या या चिवट अवशेषाशीं झगडताना शिवराजाचें जीवन अतिशय उद्बोधक ठरेल. संस्थानी जीवन हा या देशांत एक अद्भुत नमुना ठरला. त्याचें अत्यंत विदारक चित्र या कादंबरींत आहे. सत्ता आणि नादानपणा याची जोडी काय अनर्थ करू शकते हें श्री. साने यांनीं चांगलें दाखविलें आहे. रमणीकराय हा आपल्या जात-भाईचा प्रतिनिधीच आहे ! वारुणी आणि वारयोषिता याच्या प्रतापास बळी पडणारे ‘ रमणीकराय ’ अद्यापही संपले नाहींत. याही परिस्थितींत गौरांगीसारख्या साध्वी जिजाबाईची परंपरा चालवीत आहेत. गौरांगीनें जिजाबाईचा आदर्श डोळ्यासमोर ठेवून आधुनिक युगास सुसंगत असा शिवराज ‘ घडविला ’ हें तिचें कर्तृत्व प्रभावी आहे. शिवराजानें प्रजाहित-पालनाचा आदर्श दाखविला आहे. शिवराजाचा सहकारी प्रल्हादराय हा लोकसेवकांचा आदर्श आहे. असे प्रजासेवक व लोकसेवक निर्माण होणें हें अशक्य नाहीं असें वाचकांस पटविण्यासाठीं आवश्यक तेवढा वास्तवाचा उपयोग लेखकानें कौशल्यानें केला आहे. श्री. साने याच्या या कादंबरींतील जीवन ध्येयवादी तर आहेच परंतु तरी ते आकर्षक वाटण्यासारखें त्यांनीं रंगविलें आहे याबद्दल त्याचें अभिनंदन केलें पाहिजे.

———